


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका







संपादक : प्र०ना० परांजपे

संपादन-सल्लागार : अशोक रा० केळकर, कृष्ण श्री० अर्जुनवाडकर, आशा मुंडले, द०भि० कुलकर्णी, मॅक्सीन बर्नसन

संपादन-समिती : प्र०ना० परांजपे (प्रमुख), नीलिमा गुंडी, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर

लेखन व परीक्षणार्थ पुस्तके पाठविण्याचा पत्ता : प्र०ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411007. स्थिरभाष : (020) 25694617 चलभाष : 94225 09638

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :** आनंद काटीकर, द्वारा मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411004. चलभाष : 94216 10704

**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 51. स्थिरभाष : (020) 24348756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 93731 04093 **विजय पाध्ये** - 98220 31963.
marathiabhyaparishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

**(१)** वार्षिक वर्गणी - एक वर्ष

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| व्यक्ती : | रु. १५०/- | रु. ४००/- | रु. ७००/- |
| संस्था : | रु. २००/- | रु. ५५०/- | रु. ९००/- |

सुट्या अंकाची किंमत रु. ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

**(२)** मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क रु. २,०००/- + नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

**(३) पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **वचत खाते क्र०** 20057164260 या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नांव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत रु. ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

**(४) जाहिरातीचे दर :** पूर्ण पान रु.२,५००/-, अर्धे पान रु.१,५००/-, पाव पान रु.८००/-, शुभेच्छा रु. ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

प्रकाशन : त्रैमासिक; जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी).

सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.** **या अंकाचे मूल्य रु. ४०/-**



अनुक्रमणिका

शब्दजिज्ञासा
निदर्शक/निर्देशक
विमर्श/परामर्श
त्रैमासिक/त्रैवार्षिक/आगाबा

# अनुक्रमणिका



---

## आदरांजली

**दिशा केळकर :** डॉ० अशोक केळकर यांच्या पत्नी आणि मराठी अभ्यास परिषदेच्या संगोपनात महत्त्वाची भूमिका बजावणाऱ्या दिशा केळकर ५।८।२०११ रोजी कालवश झाल्या.

**अरविंद टिकेकर :** मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सदस्य, देणगीदार व 'भाषा आणि जीवन'चे चिकित्सक वाचक. 'किर्लोस्कर कन्सल्टंट' या संस्थेचे ते संस्थापक व अनेक वर्षे व्यवस्थापकीय संचालक होते. इतरही अनेक संस्थांच्या कार्यकारिणीचे सदस्य व सल्लागार म्हणून त्यांनी काम केले. ते ४।९।२०११ रोजी कालवश झाले.

## आवाहन

या अंकाबरोबर **'भाषा आणि जीवन'**ला एकोणतीस वर्षे पूर्ण होत आहेत. या काळात **'भाषा आणि जीवन'**ला मान्यता आणि प्रतिष्ठा मोठ्या प्रमाणावर मिळाली असली तरी त्याला पुरेसे वर्गणीदार लाभलेले नाहीत. महाराष्ट्रात विद्याक्षेत्रीय गंभीर वाचन करण्याची मराठीचे अध्यापक, प्राध्यापक, विद्यार्थी आणि लेखक यांची संख्याच तुटपुंजी आहे की आपल्या खिशातील पैसे खर्च करून **'भाषा आणि जीवन'**सारखे नियतकालिक नियमितपणे मिळण्यासाठी वर्गणीदार होण्याचे महत्त्व त्यांच्या लक्षात येत नाही? **'भाषा आणि जीवन'**च्या सर्व लेखकांनी, परिषदेच्या आजीव सदस्यांनी व वर्गणीदारांनी मनावर घेतले - प्रत्येकाने आणखी निदान चार वर्गणीदार मिळवून दिले - तर **'भाषा आणि जीवन'** स्वावलंबी होईल. तिसाव्या वर्षात होणाऱ्या पदार्पणाच्या निमित्ताने ही अपेक्षा पूर्ण करण्याचे आवाहन करावेसे वाटते.





अनुक्रमणिका

**संपादकीय**

# अभिवृद्धीच्या चष्म्यातून...

प्र० ना० परांजपे

भाषा सल्लागार समितीच्या अध्यक्षपदाचा न्यायमूर्ती नरेंद्र चपळगावकरांनी राजीनामा दिल्यापासून शासनाने मराठीबाबतच्या आपल्या धोरणाचा पुनर्विचार सुरू केला असावा असे दिसते. पण त्या पुनर्विचाराचा एक भाग म्हणून साहित्य संस्कृती मंडळ आणि राज्य मराठी विकास संस्था यांचे एकत्रीकरण करण्याचा निर्णय शासन घेणार असेल तर हा पुनर्विचार तात्पुरती सोय पाहणारा व अदूरदर्शीपणाचा ठरेल. या दोन्ही संस्थांचे प्रमुखपद सध्या एकाच व्यक्तीकडे असल्यामुळे त्या संस्थांचे एकत्रीकरण सोयीचे होईल असे शासनाला वाटत असेल तर ती व्यक्ती या संस्था किती काळ सांभाळू शकेल याचा विचार शासनाने केला नसावा, असे म्हणावे लागेल. शिवाय या एकत्रित संस्थेचे काम एकच व्यक्ती कार्यक्षमतेने पार पाडू शकेल याचाही विचार शासनाने केला नसावा, की यात पार्किंसनचा कायदा लागू झाला आहे? म्हणजे एका संस्थेचे काम कार्यक्षमतेने करणाऱ्या माणसावर आणखी एका संस्थेचे काम सोपवून त्याला अकार्यक्षम ठरविण्याची ही चाल आहे?

मुळात राज्य मराठी विकास संस्थेची स्थापना का व कशासाठी झाली याचा शोध शासनाने घ्यायला हवा. खरे पाहता राज्य मराठी विकास संस्था ही 'इन्स्टिट्यूट ऑफ मराठी' आहे. तिची स्थापना १९९३ साली झाली तरी तिच्यासाठीचे प्रयत्न १९७९पासून सुरू झाले. १९७९ हे 'राजभाषा वर्ष' म्हणून साजरे करण्यात आले, त्या वेळी प्रथम अशी संस्था स्थापण्याची मागणी डॉ० अशोक केळकर यांनी केली. त्यामुळे एक अभ्यासगट नेमण्यात आला. अभ्यासगटाने संस्थेचा आराखडा तयार केला. त्या वेळीच ही संस्था स्थापन झाली असती, तिला डॉ० अशोक केळकरांसारखा संचालक लाभला असता, आणि सरकारी हस्तक्षेपापासून ती मुक्त राहिली असती तर आज तिचे मराठीच्या विद्यापीठामध्ये रूपांतर होण्याइतकी तिने प्रगती केली असती. पण त्या वेळी ते सरकार बरखास्त झाले आणि तो आराखडा बासनात बांधला गेला नंतर १९९३ साली या संस्थेची स्थापना झाली. पण त्यासाठी अभ्यासगटाने सादर केलेल्या आराखड्याचा आधार घेण्याऐवजी डॉ० सरोजिनी वैद्य यांना नवीन आराखडा तयार करण्यास सांगण्यात आले. एवढेच नव्हे, तर या संस्थेच्या संचालकपदी त्यांची नेमणूक करण्यात आली. त्या वेळी त्या मुंबई विद्यापीठाच्या मराठी विभागाच्याही प्रमुख होत्या. त्यामुळे या संस्थेला

पहिल्याच वर्षी पूर्णवेळ काम करणारा संचालक मिळाला नाही. एवढेच नव्हे, तर संस्थेसाठी स्वतंत्र नेमणुका करण्याऐवजी सरकारी महाविद्यालयातील प्राध्यापकांच्याच ठरावीक काळासाठी बदलीवर नेमणुका करण्यात आल्या. त्यामुळे 'राज्य मराठी विकास संस्था' म्हणजे शासनाचे एक अनाथ पोरके पोर ठरले.

या संस्थेच्या संचालक-पदावर एखाद्या भाषावैज्ञानिकाची नेमणूक झाली असती तर कदाचित तिचे कार्य वेगळ्या अंगाने विकसित झाले असते. केवळ पुस्तके प्रकाशित करण्याने मराठीचा विकास होईल असे त्या संचालकाला वाटले नसते. मराठीच्या विकासाचा त्याने एक सर्वांगीण असा नकाशा तयार केला असता आणि त्यात उपलब्ध मनुष्यबळ लक्षात घेऊन कोणत्या गोष्टींना प्राधान्य द्यावयाचे हे ठरविले असते. अभ्यास गटाने तयार केलेला आराखडा त्याने लक्षात घेतला असता; पण दुर्दैवाने किंवा शासनाच्या अदूरदर्शीपणामुळे संस्थेच्या संचालकपदी मराठी, संस्कृत अशा भाषांच्या प्राध्यापकांची नेमणूक झाली. हे प्राध्यापक विद्वान व वाङ्मयाचे जाणकार असले तरी त्यांनी मराठी भाषेचा भाषा म्हणून सखोल विचार केला नाही. त्यामुळे त्यांनी केलेल्या कामात साहित्य संस्कृती मंडळाच्या कामाची पुनरावृत्ती होत गेली. पण त्यावर या संस्थेचे स्वतंत्र अस्तित्व संपवणे हा काही फारसा योग्य उपाय नाही. साहित्य संस्कृती मंडळाबरोबर तिचे एकत्रीकरण करण्यासाठी समिती नेमण्याऐवजी तिचे पुनरावलोकन व परीक्षण करून तिच्यासाठी मार्गदर्शक सूचना करणारी समिती नेमण्यात आली असती तर ते अधिक समंजसपणाचे ठरले असते.

महाराष्ट्र शासनाचे भाषाविषयक धोरण हे फक्त मराठीपुरते मर्यादित असू शकत नाही. राज्यात मराठीबरोबरच इंग्रजी, हिंदी, संस्कृत, उर्दू, गुजराती, कन्नड अशा अनेक देशी भाषांचे भाषक राहतात. त्यांना कारणपरत्वे जर्मन, फ्रेंच, जपानी, चिनी अशा परकीय भाषांचाही वापर करावा लागतो. राज्याच्या शिक्षणविषयक धोरणात अशा सगळ्या भाषांचा विविध स्तरांवर विचार व समावेश करावा लागतो. प्रशासनाचा अंतर्गत व्यवहार, केंद्र सरकारशी होणारा व्यवहार, न्यायालये, वृत्तपत्र, चित्रपट, चित्रवाणी इत्यादी प्रसारमाध्यमे, जाहिराती अशा जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत भाषेचा सातत्याने संबंध येतो, म्हणून शासनाने केवळ मराठीविषयक नव्हे, तर भाषाविषयक धोरण ठरविले पाहिजे आणि त्या चौकटीत मराठीच्या अभिवृद्धीचा प्राधान्याने विचार केला पाहिजे. तसे केले तर दुकानांवरील नामफलकांपासून मंत्र्यांनी माध्यमांना द्यावयाच्या मुलाखतीपर्यंत सर्वच गोष्टींचा शासनाला विचार करावा लागेल.

आपण निर्माण केलेल्या संस्थांच्या चौकटींच्या चष्म्यातून मराठीचा विचार करण्याऐवजी मराठीच्या सर्वांगीण व सर्वसमावेशक अभिवृद्धीच्या चष्म्यातून आपल्या संस्थांकडे शासन पाहू लागले तरच आजच्या परिस्थितीत फरक पडू शकेल. ■

# अभिलेख : विध्वंस आणि संरक्षण

ब्रह्मानंद देशपांडे

**(१) आमुख**

अभिलेख (epigraphs) हे प्राचीन भारतीय इतिहासाचे अव्वल दर्जाचे साधन मानले जाते. प्राचीन भारतातील राजवंश, राजे, त्यांचे युद्धप्रसंग, राजाचे मंत्री, अधिकारी, दानविषयक गावे (अग्राहार), त्यांच्या चतु:सीमा, नद्या, पर्वत, समाजजीवन, आर्थिक जीवन अशा अनेक विषयांवर अभिलेखांमधून प्रकाश पडतो. या अभ्यासाचे महत्त्व अपार आहे.

हे लेख तांब्याचे पत्रे (ताम्रपट), रजतपट क्वचित सुवर्णपट, लोहस्तंभ वा दगडांवर (शिलालेख) असतात. ताम्रपट सहसा नष्ट वा क्षतिग्रस्त होत नाहीत. म्हणून ताम्रपट म्हणजे शासनाची अगदी पक्की सनद समजली जाते. लोकमान्य टिळकांच्या 'म्लेंच्छांना हिंदुस्थानचा ताम्रपट देवाने लिहून दिला नाही' या वाक्यात तोच ध्वनी आहे.[१] मात्र ताम्रपट हे व्यक्तिगत मालकीचे असतात. आणि त्यातील दानविषय गाव असल्यामुळे ताम्रपट बनावट असण्याची शक्यता बळावते. अशा बनावट ताम्रपटांवर एक विदारक लेख फ्लीट यांनी लिहिला आहे.[२] शिलालेखाचे मात्र तसे नाही. ते शिळेवर असतात. देऊळ, बारव, सभामंडप, चावडी आदि सार्वजनिक ठिकाणी असतात. म्हणून ते बनावट असू शकत नाहीत.

**(२) शिलालेखाचा विध्वंस**

शिलालेख हे प्राचीन भारतीय इतिहासाचे असे महत्त्वाचे साधन आहे. पण अनेक मार्गांनी या साधनांचा नाश होत असतो. त्यातील काही महत्त्वाची कारणे अशी :

**(१) नैसर्गिक कारणे**

(अ) महाराष्ट्रातील 'बसाल्ट प्रस्तर' (Deccan trap) हा थोडा ठिसूळ आहे. ऊनपावसाच्या माऱ्याने सतत प्रसरण व आकुंचन होऊन या दगडाचे पापुद्रे सुटतात. पैठण येथे गोदावरीकाठी नागघाट बांधल्याचे दोन शिलालेख - एक संस्कृत आणि एक मराठी - आनंदराव रघुनाथ सुमंत यांचे आनंद संवत्सर, शके १६५६, माघ शुद्ध एकादशी, या तिथीचे होते. ते दगडाचे पापुद्रे निघून आता नष्टप्राय झाले आहेत. सिल्लोड (जिल्हा औरंगाबाद) येथे शिवनाथपुर भागात यादव सम्राट सिंधणदेव (द्वितीय) याचा शके ११५२चा

शिलालेख आहे[३] त्याच्या डावीकडील कोपऱ्याचा मोठा टवका उडाला आहे.

(ब) वारा, ऊन, पाऊस यांनी शिलालेखांची हानी होते. अजिंठा लेणे क्र० १६, आणि १७ यांच्या दर्शनी भिंतीवरचे महत्त्वाचे वाकाटककालीन शिलालेख हे वरून पडणाऱ्या पाण्याच्या प्रवाहाने क्षतविक्षत झाले आहेत.

**(२) मानवकृत विध्वंस**

**(अ) धार्मिक द्वेषातून विध्वंस :** धार्मिक द्वेषातून शिलालेखांचा नाश केला जातो. अंबाजोगाई (जिल्हा बीड) येथे भोगादित्य या सूर्यदेवतेचे मंदिर होते. त्याची मशीद झाली. (दगडी मशीद म्हणून 'संगी' मशीद. शं०गो० तुळपुळे 'संगीत मशीद' म्हणतात ते चूक आहे.[४]) मंदिराच्या दोन खांबांवर मिळून सिंघणदेव नामक नृपतीचा लेख दोन भागांत होता. तुळपुळे या नृपतीला कलचुरीवंशीय ठरवतात. तो सेउणदेशकर यादव सिंघणदेव (प्रथम) आहे हे आम्ही साधार दाखविले आहे.[५] या लेखाचा एक भाग प्रार्थनेसाठी बांधलेल्या तीन पायऱ्यांच्या ओट्यात (मिंबर) गेला आहे. उर्वरित लेख छापला गेला खरे; पण तोही आता बुजवून टाकला आहे असे ऐकतो. नंदूरबार येथील लक्ष्मीदेव नामक नृपतीचा शिलालेख असाच नष्ट झाला.

**(ब) काही हेतूने विध्वंस :** पुष्कळदा प्राचीन लेखाची शिळा नवीन लेख कोरण्यासाठी वापरली जाते. देवटेक (तालुका ब्रह्मपुरी, जिल्हा चंद्रपूर) येथे एक अशोककालीन शिलालेख होता. त्याच्या खालील भागावर वाकाटक नृपती रुद्रसेन याचा लेख कोरण्यात आला आहे.[६]

भांदक (जिल्हा चंद्रपूर) येथील भद्रनागाच्या मंदिरात एक शिलालेख आहे. भांदक हे सूर्यउपासनेचे केंद्र (भानुक-भानक-भांदक). तेथील स्थल-माहात्म्यात त्याचे नाव भानक असेच येते.[७] या शिलालेखात सूर्यउपासनेचा निर्देश होता. त्याचा वरचा भाग तासून त्यावर परमार वंशाचा लेख कोरला आहे. पण खालच्या भागातील वेगळ्या लिपीतील 'ध्येय सदा सवितृमंडल' हा श्लोक स्पष्ट वाचता येतो.[८]

राजापूर अथवा जांबराजा (तालुका औंढे नागपाथ, जिल्हा हिंगोली) येथील एक शिलालेख तर टाकीचे घाव घालून नष्ट केला आहे.[९] देवगिरी (दौलताबाद) येथील मेंढा तोफेसमोरचा लॉर्ड लिनलिथगो याचा लेख असाच नष्ट झाला. याशिवाय गावातील व्रात्य मुले, गावगुंड आदींच्या विध्वंसक वृत्तीमुळे शिलालेखांना क्षती पोचते. पाली (तालुका आणि जिल्हा बीड), पाटण (तालुका चाळीसगाव, जिल्हा जळगाव) येथील शिलालेख गुराखी मुलांनी काठ्या आपटून क्षतिग्रस्त केला. एकतुनी (तालुका पैठण, जिल्हा औरंगाबाद)

येथे तीर्थंकर धर्मनाथ (लांच्छन वज्र) मूर्ती होती. तिच्या पदस्थलावर यादवनृपति सिंघणदेव (द्वितीय) याचा शके ११३३चा लेख आहे. तो गुराखी मुलांनी काठ्या आपटून जवळजवळ नष्ट केला. ही मूर्ती आता जवळच्या रजापूर गावात कासलीवाल यांच्या शेतात आहे. धर्मापुरी (तालुका अंबाजोगाई, जिल्हा बीड) येथे चालुक्य नृपती सोमेश्वर (तृतीय) भूलोकमल्ल याचा शिलालेख होता. तो वाकडी नामक गावी अंघोळीचा दगड म्हणून वापरण्यासाठी नेला. त्याचे तीन तुकडे झाले. घटोत्कच लेणे (तालुका सोयगाव, जिल्हा औरंगाबाद) येथील वाकाटककालीन लेख नष्टप्राय झाला आहे. पंढरपूर येथील विठ्ठल मंदिरात दात्यांची नावे कोरलेला शिलालेख हा भाविकांनी पाठी घासून अस्पष्ट करून टाकला आहे.[१०] नागाव येथील शिलालेख मंदिराच्या दाराजवळ पायऱ्यांजवळ बसवला आहे. पाथरवाला (ता०शहागड, जि०औरंगाबाद) येथील लेख अगदी पूर्णपणे नष्ट झाला आहे.

**(३) संरक्षक उपाय**

अशा प्रकारे इतिहासाचे हे साधन नष्ट होत असता काही संरक्षक उपाय केले पाहिजेत.

(अ) शिलालेख जर सुटा असेल तर तो उचलून ऊन, पाऊस आणि मानवी उपद्रव यांपासून वाचवण्यासाठी चांगल्या सुरक्षित जागी ठेवावा. त्याच्या अक्षरात रंग भरू नये.

(ब) शिलालेख भिंतीत वा खांबावर असेल तर त्याला जाळीचे आवरण घालावे.

(क) त्याचे स्पष्ट ठसे घेऊन वाचन करून ठसे आणि वाचन संभाळून ठेवावे. गावातील लोकांना त्याचे महत्त्व पटवावे.

**(४) समारोप**

वेरूळ येथे घृष्णेश्वराचे प्राचीन मंदिर होते. ते मूर्तिभंजकांनी फोडले. त्याचा जीर्णोद्धार मालोजीराजे भोसले यांनी केला व त्यावर आपले लेख कोरले.[११] हेही मंदिर यवनांनी फोडले. ते पुण्यश्लोक अहिल्याबाईंनी पुन्हा बांधले. तेव्हा हे भोसल्यांचे शिलालेख त्या महासाध्वीने आडवळणी उंचावर लावले.

**संदर्भ :**

( १ ) स्मरणातून
( २ ) J. F. Fleet, IA XXX, pp.201-223
( ३ ) ब्रह्मानंद देशपांडे, *शोधमुद्रा,* खंड पहिला, पृ० ६१-६४
( ४ ) शं०गो० तुळपुळे, *प्राचीन मराठी कोरीव लेख,* पृ० ३५१-५४

( ५ ) ब्रह्मानंद देशपांडे, उपर्युक्त पृ० १०७-११४
( ६ ) CII., V, pp./ J-4
( ७ ) ब्रह्मानंद देशपांडे, *शोधमुद्रा,* खंड पाचवा, पृ० ९८
( ८ ) शं०गो० तुळपुळे, उपर्युक्त, पृ० ३७-४२, प्रतिमा, पृ० ६
( ९ ) तत्रैव, संपादकीय निवेदन, p.16., छायाचित्र प्रस्तावना,
पृ० ४६-४७च्या मध्ये
(१०) तत्रैव, पृ० १६६
(११) दत्तो त्रिमल वाकनीस, *श्री शिवछत्रपतीची ९१ कलमी बखर,* संपादक
वि०स० वाकसकर, पृ० ८

■

## आफ्रिकेतील भाषा ही सर्व भाषांची जननी

इंग्रजी असो वा बंगाली, हिंदी असो व जपानी सगळ्या भाषांचा जन्म प्रागैतिहासिक काळातील एका आफ्रिकी भाषेतून झाल्याचा दावा नव्या अभ्यासातून पुढे आला आहे. ५०० भाषांचा अभ्यास केल्यानंतर सर्व भाषांचे मूळ अश्मयुगातील आफ्रिका खंडात सापडत असल्याचे या भाषा-अभ्यासकांचे म्हणणे आहे. भाषेची उत्पत्ती आफ्रिकेत झाली यासोबत मौखिक संवादाला सुरुवात एक लाख वर्षांपूर्वी झाली असल्याचे या संशोधनातून पुढे आले आहे. यापूर्वीच्या अंदाजापेक्षा फार आधीपासून भाषा अस्तित्वात असल्याचे यामुळे सिद्ध होत असल्याचे 'डेली मेल'ने म्हटले आहे. आफ्रिकेत सापडलेला पहिल्या आधुनिक मानवाचा कालावधी दोन लाख ते दीड लाख वर्षांपूर्वीचा मानला जातो. ७० हजार वर्षांपूर्वीपासूनचा मानव जगभरामध्ये स्थलांतर करू लागला. तेथून भाषेचेही जगभरात स्थलांतर झाले, असे अभ्यासकांनी म्हटले आहे. भाषांच्या निर्मितीसंबंधी अनेक वाद आहेत, त्यांची निर्मिती प्रत्येक देशामध्ये विविध काळात, स्वतंत्ररीत्या झाल्याचे काही जणांचे म्हणणे आहे, तर काहींच्या मते एकाच वेळी त्यांची निर्मिती झाली. क्वीन्सलॅण्ड विद्यापीठाचे प्रमुख अभ्यासक डॉ० क्वेन्टीन ॲटकिन्सन यांनी भाषेच्या आफ्रिकी मुळाचा दावा केला आहे. जगभरात बोलल्या जाणाऱ्या ५०४ भाषांमधील उच्चार, ध्वनी यांच्या आधारे त्यांनी हा दावा केला आहे.

- दै० लोकसत्ता (१७.०४.२०११)
प्रेषक - रमेशचंद्र पाटकर





अनुक्रमणिका

माध्यमान्तर/माध्यमान्तर - ?
Harmonization

# साहित्यकृतीचे माध्यमान्तर

अरुण खोपकर

'साहित्यकृतीचे माध्यमांतर' या विषयावर बीजभाषण देण्याकरता मला इथे बोलावले ह्याबद्दल मी कार्यक्रमाच्या नियोजकांचा आभारी आहे. सिनेमा आणि साहित्य यांना जोडणारा एक महत्त्वाचा दुवा लय हा आहे. मराठी भाषेच्या लयीचे गाढे अभ्यासक आणि श्रेष्ठ भाष्यकार डॉ० ना०ग० जोशी यांच्या स्मृतीला मी हे भाषण अर्पण करतो.

माध्यमांतर ही सर्जनातून निर्माण होणारी कृती आहे. माध्यमांतर करणाऱ्या कलावंताला सर्व सर्जनशील कलाकारांप्रमाणे धोका पत्करावा लागतो. तो माध्यमांतर करीत असलेली साहित्यकृती कितीही श्रेष्ठ असली तरी त्यातून श्रेष्ठ सिनेमा निर्माण होईल ह्याची खात्री देता येत नाही. त्याचा व्यत्यास विचारात घेतला तर एखादा श्रेष्ठ चित्रपट ज्या साहित्यकृतीचे माध्यमांतर असतो, ती श्रेष्ठ असेलच असे सांगता येत नाही.

सिनेमा, साहित्य, चित्रकला अशा अनेक माध्यमांच्या सर्जनक्रियेत, रचनेत आणि कार्यपद्धतीत साम्य दिसून येते. त्यामुळे माध्यमांतराचा विचार करताना आपण एकूण कलांच्या कार्यपद्धतीचा विचार केला तर ते अधिक फलदायी ठरेलसे मला वाटते.

लेन्सेस, प्रकाशयोजना, रंगरचना, शॉट्समध्ये विभागणी आणि ध्वनीची रचना ह्या गोष्टी सिनेतंत्राचा भाग आहेत. पण इतर कलाप्रकारांचा विचार केल्यावर ह्यातल्या अनेक गोष्टी त्यात दिसू लागतात. विविध कला एकमेकींत कशा शिरलेल्या आहेत याचे प्राचीन वाङ्मयातले एक उदाहरण देतो. हे उदाहरण वाल्मिकीरामायणातले आहे. प्रसंग बालकांडाच्या द्वितीय सर्गातला आहे.

वाल्मिकी भरद्वाजाबरोबर तमसा नदीच्या काठावर विहार करताहेत. कामक्रीडा करत असलेले एका क्रौंचपक्ष्याचे युगुल त्यांना दिसते. तेवढ्यात अकस्मात् एका निषादाचा बाण नराच्या शरीरात घुसतो. त्या नंतरच्या निवेदनातले हे दोन श्लोक पहा :

**तं शोणितपरीताङ्गं चेष्टमानं महितले ।**
**भार्या तु निहतं दृष्ट्वा रूराव करुणां गिराम् ॥**
**वियुक्ता पतिना तेन द्विजेन सहचारिणा ।**
**ताम्रशीर्षेण मत्तेन पत्रिणा सहितेन वै ।**

ह्या प्रसंगाचे चित्रण करताना वाल्मिकींनी जणू शॉट्सची विभागणी केली आहे

आणि ध्वनिरचनाही सुचवली आहे. ह्यातली पहिली ओळ पहा

**तं शोणितपरीताङ्गं चेष्टमानं महितले ।**

शॉटच्या सुरुवातीला चित्रचौकटीत फक्त जमीन आहे. रक्ताने भरलेला नर एकदम धबकन येऊन चित्रचौकटीत पडतो. हवेत निषादाच्या धनुष्याचा टणत्कार घुमतो आहे. त्याची आस पक्ष्याच्या पडण्याच्या धब्ब अशा आवाजाने तुटते.

त्यानंतर शांतता आहे. ही शांतता मादीच्या आर्त रुदनाने भंग पावते.

**भार्या तु निहतं दृष्ट्वा रूराव करुणां गिराम् ॥**

**वियुक्ता पतिना तेन द्विजेन सहचारिणा ।**

ह्या शॉटमध्ये मादीचा क्लोज-अप आहे. आधी नर जिथे होता ती जागा रिकामी आहे. नराची अनुपस्थिती सुचवते आहे. पूर्वभूमीला रुदन करणारी मादी आहे आणि पार्श्वभूमीला रक्तात लबधबलेला, तडफडणारा नर आहे.

**ताम्रशीर्षेण मत्तेन पत्रिणा सहितेन वै ।**

हा एक एक्स्ट्रीम क्लोज-अप आहे. कामभावनेमुळे मत्त झालेल्या नराच्या ताम्रवर्णाच्या शिराचे त्यात वर्णन आहे. ह्यातील ताम्रवर्ण उन्मादाने प्राप्त झालेला आहे. हा रंग उत्तेजित करणारा आहे; परंतु ताज्या रक्ताच्या रंगापेक्षा तो सौम्य आहे. ह्या मृत किंवा मरणोन्मुख नराच्या शिराने सर्व सिनेमास्कोप पडदा भरून गेला आहे. नराचे निस्तेज डोळे हळूहळू मिटत आहेत. त्यातली कामेच्छा, जीवनेच्छा, चैतन्य सारे काही ओसरून जात आहे. ह्या दृश्यानंतर, हे क्रौर्य पाहणाऱ्या वाल्मीकींच्या तोंडून, दोन श्लोकांनंतर प्रसिद्ध शापवाणी ऐकू येते :

**मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ।**

**यत् क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥**

ही शापवाणी संपूर्ण आसमंतात घुमते. म्हणजे एको किंवा रेव्हबरेशनचा वापर आहे.

यातले इमेज-साईझेस आणि संकलनक्रम हा वाल्मीकींनीच दिलेला आहे. मी फक्त त्या ओळी तोडून दाखवल्या. अर्थात, ही एकमेव रचना या वर्णनात दिसते आहे, असे मला म्हणायचे नाही. दुसरा दिग्दर्शक ह्यात दुसरी रचना बघू शकेल. पण प्रतिमा आणि ध्वनी यांची उत्तम रचना मुळात लेखनात आहे आणि त्यात सिनेमा दडलेला आहे.

मी दिलेले उदाहरण हे निर्विवाद अभिजात साहित्यातले आहे. पण लोकप्रिय साहित्यात, विशेषतः बेस्टसेलर्स किंवा जंगी खपाच्या कादंबऱ्यांत दृश्यांची वर्णने किती तपशीलवार असतात; त्यातून सिनेमा दिसत नाही का? ह्या प्रश्नाचे उत्तर मला नकारार्थी द्यावेसे वाटते. कारण ह्या कादंबऱ्या, अनेकदा त्यांचे चित्रपटात रूपांतर होईल ह्यावर डोळा ठेवून, मुद्दाम सिनेमाच्या धर्तीवर लिहिल्या जातात. त्यांच्यातील सिनेतत्त्व हे बहुधा नकली आणि ओढूनताणून आणलेले असते. त्यातून *सिनेमाला* काही नवीन मिळत नाही





अनुक्रमणिका

आणि *साहित्यालाही* नाही. अभिजात लेखक आपल्या प्रतिमा शोधतो, तावून सुलाखून घेतो आणि त्यांच्या परस्परसंबंधांचा प्रत्येक दुवा कसोशीने जोडतो. त्याच्या लेखनात, सहजपणे आणि कधी तरी त्यालाही नकळत, सिनेमा येतो.

**सिनेमा आणि साहित्य : रशियातील विचारवंत**

सिनेमाच्या प्रारंभीच्या सुमारे तीन ते चार दशकात, सिनेविचारवंतांचा प्रयत्न, ह्या नव्या माध्यमाचे वेगळेपण, त्याचे असे खास गुणधर्म आणि रचनापद्धती शोधण्याकडे होता. बेला बालाझ, म्युन्स्टेरबर्ग, आर्नहाईम ही त्यातली प्रमुख नावे.

त्याउलट रशियात फॉर्मलिस्टांनी त्याच सुमारास आपले लक्ष विविध कलांच्या कार्यपद्धतीवर आणि रचनेवर दिले. कलांतील साम्य शोधण्याचा प्रयत्न केला. त्यांच्यासमोर मुख्यतः साहित्य होते. त्यात श्क्लोव्हस्की, तुनियानव्ह, आईखेबाऊम इ०चा समावेश होता.

सुप्रसिद्ध रशियन सिनेदिग्दर्शक सर्गेई मिखायलोविच आईझेन्श्टाईन हे फॉर्मलिस्टांच्या जवळचे होते पण त्यांचे त्या मंडळींशी वादही होते. त्यांचा प्रतिभावंत कलाकार म्हणून रंगभूमी आणि सिनेमा या दोन माध्यमांशी संबंध आला होता. त्याबरोबरच ते उत्तम रेखाचित्रकार होते. त्यांच्या सिने-कलाकृती, विशेषतः *बॅटलशिप पत्योमकिन* हा चित्रपट, अजूनही सिनेमाध्यमाला समृद्ध करणाऱ्या जगातल्या महत्त्वाच्या चित्रपटात गणला जातो. कलांचा आतून अनुभव घेतल्याने त्यांच्या विचाराला एक वेगळी घनता आली होती.

साहित्यकृती आणि सिनेमा ह्यांच्या परस्परसंबंधांबद्दल, विशेषतः प्रख्यात साहित्यकृतींच्या आणि सिनेमाच्या रचनापद्धतीत असणाऱ्या साम्याचे सर्वोत्कृष्ट विश्लेषण आईझेन्श्टाईन यांनी केले आहे. 'डिकन्स, ग्रिफीथ अँड फिल्म टुडे' ह्या लेखात त्यांनी ग्रिफीथ यांना क्लोज-अपचा सिनेमातला पहिला वापर करण्याची कल्पना डिकन्सच्या वर्णनशैलीतून कशी मिळाली ह्याचे विश्लेषण केले आहे. त्याखेरीज त्यांनी पुश्किन, तल्स्तोय, मोपासां, ग्युस्ताव्ह फ्लोबेर, गगोल ह्यांच्या अनेक कृतींचे तपशीलवार आणि सूक्ष्म विश्लेषण करून साहित्य आणि सिनेमा ह्यांतली साम्यस्थळे दाखवली आहेत.

आईझेन्श्टाईन यांच्या काही लेखांची नांवे अशी आहेत *'संकलक पुश्किन', 'तल्स्तोय यांच्या अना कॅरेनिनातील रेसेसच्या प्रसंगाचे संकलन', 'मादम्वाझिल फिफि'* - हे मोपासांच्या त्याच नांवाच्या कथेचे विश्लेषण आहे - इ०इ० ह्या लेखकांचे महत्त्वाचे सीन्स घेऊन त्यातली सिनेतत्त्वे त्यांनी दर्शवली आहेत. आपले विश्लेषण गद्यापुरते मर्यादित न ठेवता, जपानी संस्कृतीवरच्या लेखात, बाशोच्या हायकूंचे आणि सिनेतत्त्वाचे संबंध त्यांनी प्रस्थापित केले आहेत. आजही साहित्यकृतींच्या माध्यमांतरावर विचार करताना त्यांचे लेखन आपल्याला मोलाचे मार्गदर्शन करू शकेल. दुर्दैवाने त्यांचे वाङ्मय फार काळ केवळ रशियनमध्येच राहिले. अजूनही परिस्थिती विशेष बदललेली नाही.

साहित्यकृतीच्या कथनपद्धतीबद्दल आणि माध्यमांतराने तिच्यात होणाऱ्या बदलांबद्दल, विचार करताना व्हिक्टर श्क्लोव्हस्कीने मांडलेल्या 'फाब्युला' आणि 'स्युझेत' ह्या संकल्पना आपल्याला विश्लेषणात उपयुक्त ठरतील. ह्याला इंग्रजीत स्टोरी आणि प्लॉट म्हणतात.

कथेतले प्रसंग कालानुक्रमाने लावले तर जी मालिका आपल्या हाती येते ती फाब्युला किंवा स्टोरी. आणि तिची निवेदनातली मांडणी हा स्युझेत किंवा प्लॉट. कोणत्या स्तरावर साहित्यकृतीत बदल केले आहेत ह्याचे माप घेण्याची ही एक मोजपट्टी आहे.

काही फॉर्मलिस्ट आपल्या विश्लेषणात यापुढे अनेक पायऱ्या गेले. घटना, पात्रे, त्यांचे व्यक्तिविशेष, ह्या गोष्टीदेखील फॉर्मलिस्टांना महत्त्वाच्या वाटू लागल्या. त्यांनी संख्याशास्त्राचा वापर करून एकेका व्यक्तिखेरीज चेहऱ्याच्या एकेका तपशिलाचे कितीदा उल्लेख आलेत आणि ते कसे कसे आलेत हे तपासून कथनशास्त्राला गणिती बैठक देण्याचा यत्न केला. नाकाचे, डोळ्यांचे, भिवयांचे, त्वचेचे, गालाचे, कानाचे इ० किती उल्लेख कोणत्या प्रकारे आले आहेत आणि ते कसे एकत्र येतात याचाही त्यांनी अभ्यास केला. ल्योव्ह तल्स्तोय यांच्या डायऱ्यांचा अभ्यास करून त्यांच्या कथनशैलीचे संख्याशास्त्राच्या अनुषंगाने विवेचन केले. कॅरलिन स्पर्जनने इंग्रजीत शेक्स्पिअरच्या शैलीचे अशा प्रकारे विश्लेषण केले आहे.

**रंगकथानक**

आंद्रे ब्येली ह्या साहित्यविदाने आपल्या ***पोएतिका गगोल्या*** (गोगोल्स पोएटिक्स) या ग्रंथात गगोलच्या लेखनाचा अभ्यास केला आहे. त्यात एक भाग केवळ रंगाविषयी आहे. गगोलने आपल्या आयुष्याच्या कोणत्या काळात कोणत्या रंगांचा उल्लेख केला, त्याकरता कोणते शब्द वापरले आहेत इ० गोष्टींचे विवरण केले आहे. ब्येलींच्या या विश्लेषणातून गगोल यांनी वापरलेल्या रंगांच्या आलेखाशी निगडित असा त्यांच्या सर्जनशीलतेचा आणि त्यांच्या मानसिक अवस्थेचा आलेख दिसतो. जसजसे गगोल यांचे वय वाढले तसतसे त्यांनी कमी कमी रंग वापरले. त्यांच्या आयुष्याच्या शेवटच्या काळात ते फक्त काळा, सोनेरी आणि लाल हे तीन रंग वापरतात. मात्र त्यांच्या वर्णनाकरता वापरलेल्या शब्दांची संख्या वाढते. ह्या तीन रंगांच्या अधिकाधिक सूक्ष्म छटांचे ते वर्णन करू लागतात. आयुष्यात येणाऱ्या वाढत्या नैराश्याबरोबर काळ्या रंगाचा त्यांचा वापर वाढू लागतो. रंग हा अनेक कलांत महत्त्वाचा रचनाघटक आहे. रंगरचना हे सिनेकथानकाचे उपकथानकच होते. साहित्यातही रंगाचा उपयोग करून उत्तम उपकथानक कसे साधते त्याची काही उदाहरणे इथे देतो.

**श्वेत वर्ण**

पहिले उदाहरण एमिल झोलाच्या Aux Bonheur des Dames ऊर्फ





अनुक्रमणिका

Ladies' Paradise, ह्या कादंबरीतले आहे. प्रसंगस्थळ आहे पॅरिसमधले एक फॅशनच्या कपड्यांचे दुकान. ह्या दुकानात फक्त पांढऱ्या रंगाच्या विविध प्रकारच्या कापडांची मांडणी केली आहे. एखादा श्रेष्ठ आर्ट डिरेक्टर, प्रकाशयोजनाकार आणि दिग्दर्शक यांनी एकत्र येऊन जरी असा सीन मांडायचा ठरवला तरी ते सोपे नाही.

The White Sale

"Oh! How unusual!" the women exclaimed. "Unheard of!" They did not grow tired of this song of white which was sung by the fabrics of the whole store. ... In this white cascade, in the apparent chaos of fabrics falling literally at random from disemboweled shelves, there was a harmonic phrase; Nuances of white followed and unrolled one after the other; they were born, grew performed a whole orchestral fugue of a great musician, whose gradual development carried souls off into increasingly extensive flights. Everything there was only whiteness, but it was never the same; all these white nuances rose one over the other, contrasted, supplemented each other, finally achieving the shining of real light.

The white symphony was begun by the dull whiteness of the linen and... muted white tones of flannel and cotton, then came velvet, silk, satin, the rising gamut little by little becoming ignited by the tiny flames on the edges of the folds; the whitness flew upward in the transparency of the curtains, was penetrated by light in the muslin, guipure, lace and especially in the tulle which was so light that it seemed the highest note lost in the air, and next in the depths of the gigantic alcove, even more loudly sang the silver of the Oriental silk."

ह्या वर्णनात पांढऱ्या कापडांचे विविध प्रकार, प्रत्येकाचे पोत, जाडी किंवा तलमपणा, प्रकाश परावर्तित करण्याचे गुणधर्म, अवकाशाची रचना ह्या साऱ्याचा उपयोग करून केवळ पांढऱ्या रंगाच्या वापराने स्त्री-ग्राहकांना उन्मादाच्या अवस्थेपर्यंत नेण्याचे कपड्यांच्या मांडणीच्या वर्णनाचे सामर्थ्य उत्तम साहित्याबरोबर उत्तम सिनेमाचाही नमुना आहे.

मराठी संतवाङ्मयात रंगाच्या आणि नादाच्या वर्णनाची अतिसुंदर उदाहरणे आढळतात. झोलाचे जे उदाहरण दिले त्यात रंगाच्या सौंदर्याचा अनुभव मिळतो. संतसाहित्यात रंगसंवेदनांबरोबर अनेकदा एक आध्यात्मिक अनुभव जोडलेला असतो. सिनेमाच्या भाषेत बोलायचे म्हटले तर ऐंद्रिय मोंताझबरोबर इंटलेक्चुअल मोंताज साधून

एका अत्युच्च पातळीवर नेण्याचा त्यात हेतू असतो. ज्ञानेश्वरांची नीलवर्ण साक्षात्काराची वर्णने याच प्रकारची आहेत. अत्यंत सुंदर असली तरी ती उद्धृत करायचा मोह वेळ थोडा असल्याने टाळतो.

पांढऱ्या रंगाचे संतवाङ्मयातले एक प्रसिद्ध उदाहरण म्हणजे *धवळी भूपाळी*

**धवळ्या जटा गंगाजळ । धवळा मयंक निर्मळ ।**
**धवळे कुंडलांचा लोळ । शंखमाला लोंबती ॥**
**धवळे स्फटिकांची माळ । धवळे गळा उलथे व्याळ ।**
**धवळे हाती नर कपाळ । धवळा त्रिशूळ शोभतसे ॥**
...
**धवळे कैलासभुवन । धवळें मध्यें सिंहासन ।**
**धवळे शंकराचे ध्यान । दास चिंतन करीतसे ॥**

शिवाच्या ह्या वर्णनात पांढऱ्या रंगाच्या सुंदर आणि भयकारी दोन्ही अंगांचा अनुभव गुंफलेला आहे. गंगाजळ पांढरे आहे आणि हातात असलेल्या कवट्याही पांढऱ्या आहेत. एका रंगाचे किती विविध अर्थ होतात आणि ते परस्परविरोधीसुद्धा असू शकतात. पांढरा रंग जसा पावित्र्याशी जोडला जातो तसा मृत्युशीही जोडला जातो. ख्रिस्ती धर्मात वधूचा वेष पांढरा असतो. आणि साक्षात मृत्यू असणारा मोबी डिक हा देवमासाही पांढरा असतो. शिवाच्या वर्णनात पांढऱ्या रंगाचे हे दोन्ही आविष्कार आलेत हे विशेष.

सिनेमातल्या रंगाशी साहित्यातल्या रंगाच्या जवळचे हे नाते आहे. चित्रकलेतील रंगाच्या उपयोगापेक्षा जास्त जवळचे. कारण साहित्यात निवेदनाचा एक क्रम साधलेला असतो. तो सिनेमाच्या शॉट्सच्या मालिकेच्या अधिक जवळ येतो. चित्रकलेतल्या रंगांना अशा प्रकारे अनुक्रम नसतो.

**कृष्ण वर्ण**

काळ्या रंगाचा वापर करणारे हे मराठी काव्यातले एक शब्दचित्र बघा. ह्यात ज्या क्रमाने अवकाशाचे आणि वस्तूंचे वर्णन आहे त्यात अत्युत्तम प्रायोगिक सिनेमाची रचनातत्त्वे आहेत.

**रात्र काळी, घागर काळी, जमुनाजळे हीं काळी वो माय ॥**

आपण जर पहिली ओळ घेतली तर त्यात लाँग शॉट आहे. त्याला एस्टॅब्लिशिंग शॉट असे म्हणता येईल. यात एक गूढता आहे. ह्या काळ्या रंगातून एक घागर घेतलेली स्त्री सूचित होते. त्या पलीकडे कवी आपल्याला काही पाहू देत नाही.

**बुंथ काळी, बिलवर काळी, गळां मोती एकावळी काळि वो माय ॥**

त्यानंतर क्लोज-अपची मालिका आहे. अजून ही व्यक्ती कोण आहे ते समजत नाही.

**मी काळी, कांचोळी काळी, कांस कासिली ते काळि वो माय ॥**

आता ती दिसली. त्याकरता वापरलेले क्लोज-अप्स सूचक आहेत.

**एकली पाणिया नवजाय साजणी सवें पाठवा मूर्ति सांवळी वो माय ॥**

तिची इच्छा कळली. ह्या ओळीत पहिल्या ओळीची एकप्रकारे पुनरावृत्ती आहे. मात्र इथे उपस्थितीऐवजी अनुपस्थिती सुचवली जाते. त्या परिसरात नायिकेला हवी असलेली ती सावळी मूर्ती नाही. आणि ती एकटीच आहे.

**विष्णुदास नाम्याची स्वामिणी काळी, कृष्णमूर्ति बहु काळी वो माय ॥**

ह्या शेवटच्या ओळीत स्वामिनी आणि कृष्णमूर्ती ह्या दोन्ही बरोबर आणून समारोप केला आहे.

**साऊंड डिझायनर रामदासस्वामी**

विविध ध्वनींचा वापर करणे आणि त्यांना योग्य पातळीत एकत्र आणणे हे ध्वनिसंयोजकाचे काम असते. साहित्यात ध्वनीची जागा एकतर अर्थवाही, नादयुक्त शब्द घेतात किंवा तराण्यासारखे केवळ नादवाही शब्द येतात. ह्या दोन्ही गोष्टी साधण्यात रामदासस्वामींचा हात धरू शकणारा कवी मिळणे कठीण. सन्माननीय अपवाद अर्थातच ज्ञानेश्वरांचा.

रामदासांची ध्वनीची जाण इतकी उत्तम आहे की, ते संपूर्ण प्रसंग ध्वनिचित्र म्हणून उभे करू शकतात. आता ह्या दोन ओळीच पाहा :

**गिरीचे मस्तकी गंगा तेथुनी लोटल्या चालली बळें ।**
**धबाबां लोटल्या धारा धबाबा तोय आदळे ॥**

त्यातला धबाबां शब्द ह्याचे मिक्सिंग करताना त्यांनी खालचे सप्तक आणि महाप्राण यांचा अगदी मृदंगासारखा उपयोग केला आहे.

रामदासस्वामींच्या ध्वनीच्या उपयोगाचे दुसरे उदाहरण मनोवेधक आहे. त्याचे विवरणाकरता मी दोन भाग केले आहेत.

त्यातला पहिला भाग असा

**तेथे खण खण खण खण टाळ वाजती, झण झण झण झण यंत्रे।**
**तेथे दण दण दण दण मृदंग मंजुळ, तालबद्ध परतंत्रे ।**
**तेथे चण चण चण चण शब्द बोलती, वाणी चपळ सत्पात्रे ।**
**ते घण घण घण घण घंटा वाजती, आनुहातें शूळमंत्रे ।**

ह्या भागात त्यांची रचना ध्वनी-अनुकरण करणाऱ्या शब्दांच्या वापरातून सजली आहे. पण दुसऱ्या कडव्यात एक वेगळाच प्रकार आढळतो. तो म्हणजे इतर इंद्रियांचे विषय असलेल्या संवेदना ते ध्वनीचा वापर करून व्यक्त करतात. त्यात प्रथम तेजाचा अनुभव आहे आणि मग गंधाचा आहे. पण शब्दरचनेच्या साधारणपणामुळे ते आपापल्या





अनुक्रमणिका

सिनेस्थेशिआसारख्या अवस्थेला पोचवतात की काय असे वाटते.

> **तेथे झग झग झग झग झळकति रत्ने खचित बैसे शोभा ।**
> **तेथे धग धग धग धग तेज आगळे, लावण्याचा गाभा ।**
> **तेथे मग मग मग मग सुगंध परिमळ सत्यदयेति लोभा ।**
> **पवनतनुज दासांचे मंडप, निकट राहिला उभा ॥**

ही उदाहरणे इतक्या विस्ताराने देण्याचे कारण असे की, साहित्यकृती आणि सिनेमा ह्यांच्या परस्परसंबंधांचा विचार करताना अनेकदा लक्ष व्यक्तिरेखा, घटना, कथानक, घटनाक्रम यांच्यावरच दिले जाते. पण एका श्रेष्ठ साहित्यकृतीमध्ये अवकाशाचे, ध्वनीचे, रंगांचे आणि लयीचे अशी अनेक कथानके दडलेली असतात. त्यांचा बहुधा विचार होत नाही.

**लयविचार आणि माध्यमांतर**

सिनेमा हे दृश्य माध्यम आहे असे मूकपटावरून माध्यमाच्या स्वरूपाबद्दल विचार करणाऱ्या अनेक विचारवंतांनी म्हटले आहे. हे विधान एकांगी आहे, अर्धसत्य आहे. अर्धसत्य कधी तरी असत्यापेक्षा हानिहारक असते. तसेच ह्या विधानाचे झाले आहे. त्यामुळे सिनेमाला चित्रकलेच्या जवळचे माध्यम मानलेले आहे. पण सिनेमा हे कालबद्ध, लयबद्ध आणि कथानकप्रधान माध्यम आहे. त्यामुळे ते नाटक, नृत्य, ऑपेरा आणि साहित्य यांच्या जवळ येते.

साहित्यकृतीच्या माध्यमांतरात लयीचे किती महत्त्व आहे ह्याचे एक उदाहरण देतो. ओळी मर्ढेकरांच्या *फलाटदादा* ह्या कवितेतल्या.

ह्या इथे मी दोन प्रकारे वाचतो. प्रथम जलद लयीत.

> **फलाटदादा, बोला, बोला!**
> **मिस्कील शिंगल हिरवा झाला;**
> **गेली गाडी:**
> **फलाटदादा,**
> **आता तरि वो बोला, बोला!**

ह्या ओळी मी जलद लयीत वाचल्या. मला त्यांचे चित्रीकरण करायचे असेल तर मी गाड्यांच्या गर्दीची आणि दिवसाची वेळ घेईन. ऑफिसच्या वेळेची. ह्याच्या चित्रणात जलद लयीच्या ध्वनींचा, विशेषतः वेगवेगळ्या प्रकारच्या गाड्यांच्या चाकांच्या आवाजाचा, शिट्यांचे आवाज, लोकांचा कोलाहल, गर्दीचे शॉट्स, चहावाले, बुटपॉलिशवाले, पळणारे, वेगवेगळ्या वयाचे लोक, फलाटावरचे घड्याळ, इंडिकेटर, गाडीच्या खिडकीतून दिसणारे चेहरे, धावणारे पाय, कॅमेरा लो अँगलमध्ये अगदी जमिनीजवळ ठेवून शेवटी फक्त चाके आणि फलाट.





अनुक्रमणिका

आपल्याला ह्या ओळी आठवत असतील. या छापताना कवीने

**गेली गाडी**

ह्या शब्दानंतर ओळ सोडली आहे. त्याच्या आपण सुमारे ४ ते ६ मात्रा धरू. त्यानंतर दुसऱ्या ओळीत परत जागा सोडून नंतर

**फलाटदादा,**

हा एक शब्द वापरून मग स्वल्पविराम दिला आहे. त्याच्या आधीही तितक्याच मात्रा सुटतात.

उत्तम कवी हा एक उत्तम संकलक असतो. त्याला विरामाचे महत्त्व माहीत असते. ह्या ओळींचे चित्रीकरण करताना या विरामाकडे लक्ष देणे आवश्यक आहे. हा विराम ओवी छंदातल्या अर्ध्या ओळीसारखा आहे. तो विरामही आहे आणि पुढच्या आवर्तनाची सुरुवातदेखील आहे.

चित्रणाच्या संकलनात ह्या मात्रांना महत्त्व आहे. त्या विचारात घेतल्याशिवाय कवितेला न्याय देता येत नाही. आणि त्या विचारात घेताना यांत्रिकपणे संकलन केल्यास कवितेला इजा होते.

ह्या जलद वाचनाकरता मला सुमारे ८ सेकंद लागतात. ह्यात शॉट्सची संख्या सुमारे १५ ते २५. म्हणजे सेकंदाला २ ते ३ शॉट्स असा संकलनाचा साधारण वेग होईल.

आता मी त्याच ओळी संथ लयीत वाचतो.

**फलाटदादा, बोला बोला!**<br>
**मिस्कील शिंगल हिरवा झाला;**<br>
**गेली गाडी:**<br>
**फलाटदादा,**<br>
**आता तरि वो बोला, बोला!**

ह्या वाचनाला २२ ते २५ सेकंद लागले. त्यात मला ७ ते ८ शॉट्स दिसतात. म्हणजे प्रत्येक शॉट सुमारे तीन सेकंदाचा

ह्याचे माध्यमांतर :

रात्र, जवळजवळ निर्मनुष्य प्लॅटफॉर्म, दुरून येणारे बेडकाचे आवाज, रातकिड्यांची किरकिर, घुबडाचे एखादे ओरडणे, कुत्र्यांचे लांबून येणारे आवाज, अगदी दुरून येणारी धापा टाकल्यासारखी स्टीम इंजिनची झुकझुक, मिणमिणते दिवे, एखादी नीट न लागणारी आणि चमकत राहणारी ट्युबलाईट. प्लॅटफॉर्मच्या जवळ जवळ रिकाम्या भागांचे शॉट्स, अंधारातून प्लॅटफॉर्मकडे येणारे एकदोन पॅन शॉट्स. पहिल्या चित्रीकरणात फलाटदादा गर्दीतही एकटा दाखवला आहे आणि दुसऱ्या चित्रीकरणात त्याच्या आजूबाजूला कुणी

नसण्याचा एकटेपणा आणि खिन्नपणा आहे. तर मुद्दा असा की, विषय आणि शब्द तेच असताना लयीने आशय बदलता येतो.

**काही प्रत्यक्ष उदाहरणे**

आता प्रत्यक्ष साहित्यकृतींवर आधारित चित्रपटांबद्दल काही निरीक्षणे मांडतो. त्याकरता सिनेमात झालेल्या प्रत्यक्ष प्रयोगांच्या काही महत्त्वाच्या उदाहरणांपासून सुरुवात करावी असे मला वाटते. सर्वसामान्य स्वरूपाची सैद्धान्तिक चर्चा करण्यापेक्षा प्रथम विशिष्ट उदाहरणे घेतली तर सर्वसाधारण सिद्धांतांना निश्चित स्वरूप यायला मदत होईल असे मला वाटते.

कोणती उदाहरणे निवडावी ह्या संबंधी तीन निकष माझ्या मनात आहेत.

(१) जी माध्यमांतरे साधारण यशस्वी मानली जातात त्यांची चर्चा करावी.

(२) मूळ साहित्यकृतीत जास्तीत जास्त बदल करून तरीही यशस्वी होणारी माध्यमांतरे विचारात घ्यावीत.

(३) कमीत कमी बदल करून यशस्वी होणारी माध्यमांतरे विचारात घ्यावीत.

यात यशस्वी असा शब्दप्रयोग मी वापरला आहे. त्याचे अनेक अर्थ होऊ शकतात. अर्थातच आर्थिक यश हे मला अभिप्रेत नाही. समीक्षकांच्या दृष्टीने, विशेषत: सिने-समीक्षकांच्या आणि विचारवंतांच्या दृष्टीने जी माध्यमांतरे आपापल्या कालात यशस्वी झाली आणि कालौघात वाहून गेली नाहीत अशी माध्यमांतरे मला अभिप्रेत आहेत. ह्याबद्दल भिन्न मते असणार हे मला मान्य आहे. हा निकष वस्तुनिष्ठ नसून तो एखाद्या तात्पुरत्या चौकटीसारखा चर्चेला वापरावा इतकाच माझा उद्देश आहे.

**कुरोसावा आणि शेक्स्पिअर**

कुरोसावा अकिरा यांनी शेक्स्पिअरच्या मॅक्बेथचे जपानीत केलेले प्रसिद्ध माध्यमांतर हे माझे पहिले उदाहरण आहे. ह्या माध्यमांतराचे इंग्रजी नाव **थ्रोन ऑफ ब्लड** असे आहे. ह्या उदाहरणापासून सुरुवात करण्याचे पहिले कारण म्हणजे सर्वसामान्यत: हे एक अत्युत्तम माध्यमांतर मानले जाते. दुसरे कारण म्हणजे मूळ नाटकात आणि त्यात अनेक महत्त्वाचे फरक आहेत. त्यामुळे ह्याच्या विश्लेषणातून माध्यमांतरासंबंधीचे काही मूलभूत प्रश्न आपल्या ध्यानात येतील.

मॅक्बेथमध्ये आणि कुरोसावांच्या चित्रपटात असलेले महत्त्वाचे बदल आपण लक्षात घेऊ. मॅक्बेथची भाषा नुसती इंग्रजी आहे इतकेच नाही; तर ती शेक्स्पिअरची इंग्रजी आहे. इटालियन रंगभूमीवरच्या ऑपेरातले नेत्रदीपक नेपथ्य, संगीत ह्या सर्वाला केवळ शब्दांनी उत्तर देणारी ती भाषा आहे. *थ्रोन ऑफ ब्लड* या मॅक्बेथच्या माध्यमांतराची भाषा जपानी आहे आणि ती जपानच्या सर्वोत्कृष्ट लेखकाची भाषा नाही. सिनेमातील काल आणि अवकाश हे जपानच्या इतिहासाचा आणि भूगोलाचा भाग आहे. हे नाटक

नो-नाटकाच्या शैलीत प्रस्तुत केले आहे. एक महत्त्वाचा बदल म्हणजे लेडी मॅक्बेथला गर्भवती दाखवल्यामुळे तिच्या महत्त्वाकांक्षेला एक वेगळी परिमिती दिली आहे.

हे माध्यमांतर कसे यशस्वी होते ह्याचे सविस्तर विश्लेषण इथे करणे शक्य नाही. पण त्यासंबंधी काही आडाखे असे. शेक्स्पिअरच्या रंगभूमीत ज्या गोष्टी शब्दांनी होतात त्यांच्या अर्थवाहनाची जबाबदारी कुरोसावा आपल्या चित्रपटात ध्वनी आणि प्रतिमांवर टाकतात. शोकांतिकेतले व्यक्तिरेखांचे वेढले जाणे हे इथे प्रतिमांतून सूचित होते. दाट धुके, घोंघावणारे वारे, घोड्याच्या टापा, खिंकाळणे, रात्री येणारे पक्ष्यांचे थवे अशा अनेक प्रतिमांनी आणि ध्वनींनी सिनेमातल्या व्यक्तिरेखा वेढल्या जातात. एका निर्दय निसर्गाचे, चित्रण केल्याने त्याचे प्रतिबिंब व्यक्तिरेखांत उमटते.

ज्या नाट्यशैलीवर हा चित्रपट आधारलेला आहे ती नो-नाट्यशैली ही सांकेतिक शैली आहे. ती दैनंदिन जीवनापासून वेगळी, खऱ्या अर्थाने आर्टि-फिशिअल म्हणजे जिच्यात 'आर्टिफिस'चा विपुल वापर आहे अशी शैली आहे. तिच्यातल्या पात्रांच्या हालचालीत ती जवळजवळ जमिनीपासून पावले उचलत नाहीत. शोकांतिकेत व्यक्तिरेखांना दैवाने खिळवून टाकल्याची आणि सारी दैवाची खेळणी असल्याची भावना ह्या शैलीतल्या संकेतांनी समर्थपणे प्रगट होऊ शकते. वरवर नसले तरी रचनेच्या दृष्टीने आपल्या कथकली या शैलीशी तिचे साम्य आहे.

सिनेमा हे एक दृक-श्राव्य माध्यम आहे. त्यात दृश्याचा आणि ध्वनीचा भाग हा सारखाच महत्त्वाचा आहे. त्या दोन्हीना एकत्र बांधणारी आणि सिनेअनुभवाला एकता देणारी म्हणजे लय. लयीचा विचार करण्याची सिनेचर्चेची भाषा अजून तयार झाली नाही आणि ती कधी होईल किंवा होईल किंवा नाही हे सांगता येत नाही. त्यामुळे सिनेअनुभवाचा हा गाभा अनुल्लेखित राहतो. मग त्यावर चर्चा तर दूरच. कुरोसावांनी त्यांच्या चित्रपटात एक गंभीर लय पकडली आहे. ती प्रतिमांच्या मालिकांची आहे, ध्वनीची आहे आणि त्यांच्या परस्परसंबंधांतून येणाऱ्या एका चतुर्मिती जगाचीही आहे.

माध्यमांतराच्या एकूण पटाचा विचार करताना एका बाजूला मूळ कलाकृतीत मूलभूत म्हणण्यासारखे बदल करणारे कुरोसावा आहेत; तर दुसऱ्या बाजूला मूळ कादंबरीतला किंवा नाटकातला सर्व तपशील कायम ठेवून केलेली माध्यमांतरेही आहेत. मग मूळ साहित्यकृतींपासून दूर जाऊन केलेली माध्यमांतरेच त्यांना न्याय देऊ शकतात का? ह्या प्रश्नाचे उत्तर साधे नाही. ह्याकरता काही उदाहरणे तपासून पाहू.

### मनी कौल यांची माध्यमांतरे

भारतीय चित्रपटाच्या इतिहासात १९६८च्या सुमारास मनी कौल यांनी आपल्या पहिल्या तीन चित्रपटांत साहित्यातून माध्यमांतर करून चित्रनिर्मिती करायला प्रारंभ केला. एकप्रकारे ह्या तीन चित्रपटांना साहित्यकृतींच्या माध्यमांतरांची ट्रिलजी म्हणता येईल.

ह्यातला पहिला चित्रपट म्हणजे मोहन राकेश ह्यांच्या *उस की रोटी* ह्या लघुकथेवर आधारित होता. दुसरा चित्रपट हा *आषाढ का एक दिन,* हा मोहन राकेश यांच्या त्याच नावाच्या नाटकावर आधारित होता. तिसरा चित्रपट हा एका राजस्थानी लोककथेवर आधारित होता. त्याचे नांव *दुविधा.* नंतर अनेक वर्षांनी अमोल पालेकरांनी ह्याच कथेवर आधारित चित्रपट केला होता. त्याचे नांव 'पहेली.'

कौलांच्या चित्रपटांनी जाणकार प्रेक्षकांतही दोन गट पडले. एक गट हे चित्रपट काही नवीन प्रकारचा सिनेमा निर्माण करू पाहात आहेत असे वाटणाऱ्यांचा आणि दुसरा गट हे अत्यंत कंटाळवाणे चित्रपट आहेत आणि ते सपशेल फसलेले आहेत असे वाटणाऱ्यांचा. दुसऱ्या गटात बरेच मान्यवर साहित्यिकही होते. हिंदी साहित्यात, कौलांनी राकेश ह्यांच्यावर मोठा अन्याय केला आहे, अशा प्रकारचे आरोप होऊ लागले. श्री० राकेश ह्या गदारोळाच्या बाहेर राहिल्याने तो लवकर शमला.

खरे तर कौलांनी केलेल्या चित्रपटात त्यांनी मूळ साहित्य कृतीतील संवादासकट प्रत्येक पात्र आणि घटना कायम ठेवली. मग त्यांच्यावर साहित्याची प्रतारणा केल्याचा आरोप का आला? त्याचे कारण फार महत्त्वाचे आहे. कारण कौलांनी सवयीचे आणि उघड दिसणारे नाट्य आपल्या सिनेमातून काढून टाकले. त्याची प्रतिमा, ध्वनी आणि लय यांच्यावर आधारित पण मिताभिव्यक्ती करणारी सिनेभाषा बांधायचा त्यांचा हेतू होता.

हे त्यांनी कसे केले हे पाहणे उद्‌बोधक ठरेल. प्रथम मी प्रतिमांकडे वळतो. के०के० महाजन ह्या अत्यंत समर्थ सिनेमाटोग्राफरच्या साहाय्याने त्यांनी प्रतिमांचे एक रेखीव, नियमित आणि सुसंगत जग तयार केले. *उस की रोटी* करता त्यांनी अमृता शेर-गिल ह्यांची शैली पायाभूत मानली. त्यांच्या शैलीत एक कारुण्य आहे, अनुकंपा आहे. आणि रचनातत्त्वात ऐक्य असल्याने सर्व प्रतिमा, मग त्या कुठल्याही प्रसंगाच्या असोत, एका शैलीतल्या असल्याने त्यातून एक वेगळे पण एकसंध जग आपण पाहात आहोत असे जाणवत होते.

एक महत्त्वाचा मुद्दा म्हणजे अमृता शेर-गिल ह्यांनी आधुनिक भारतीय चित्रकलेत रंगाची एक नवी जाणीव निर्माण केली होती. पण कौल यांचे चित्रपट कृष्णधवल होते. त्यामुळे त्यांच्या चित्रणशैलीत अमृताबाईंचे अनुकरण नव्हते तर त्यांच्यापासून स्फूर्ती घेऊन कौल आणि महाजन यांनी *उस की रोटी*मध्ये एक नवनिर्मिती साधली.

ह्या खेरीज एक महत्त्वाचा निर्णय कौल यांनी घेतला. प्रत्येक श्रेष्ठ दिग्दर्शकाला आपण एका सिनेमात अनेक कथानके साधतो आहोत ह्याचे भान ठेवावे लागते. त्यातले एक महत्त्वाचे उपकथानक म्हणजे लेन्सिंगचे. माझ्याकडे कौलांची एक जुनी इ-मेल आहे. त्यात ते म्हणतात,





अनुक्रमणिका

"Well, I used 28mm and 135mm in Uski Roti and not a third lens. In Ashad just one, the 32mm. Rittida hated the long focus. Even 75mm or 50mm were too romantic for him. He was on encounters of 24mm or even 18mm kind. He personally told me he needed 'universal focus.' " 19-10-2009

*उस की रोटी*मधे कौल यांनी प्रत्यक्ष घडणाऱ्या घटना आणि कल्पित घटना ह्या चित्रित करताना कोणती प्रत्यक्षात घडते आहे आणि कोणती कल्पित आहे ह्यासंबंधी संवादात काहीच सूचना दिली नव्हती. प्रत्यक्षात घडणाऱ्या घटनांकरता २८ मिलीमीटरची लेन्स वापरली होती. त्यात चित्रचौकटीची पूर्वभूमी आणि पार्श्वभूमी ह्यातला परस्परसंबंध दोन्ही स्पष्ट दिसल्याने चांगला जाणवतो आणि त्याला त्रिमिती-अस्तित्व येते. उलटपक्षी १३५ मिलीमीटरची लेन्स वापरल्यामुळे चित्रचौकटीची पार्श्वभूमी अगदी पुसट आणि धूसर होते आणि व्यक्तिरेखांचा पार्श्वभूमीबरोबर आणि वातावरणाबरोबर असणारा संबंध सैल होतो.

सर्वसामान्यत: लघुकथा किंवा नाटक यांचे माध्यमांतर होत असले तर त्यात घटना, स्थळे, प्रसंग आणि व्यक्तिरेखा यांची संख्या वाढवून मूळ साहित्यकृती भरून टाकण्याकडे दिग्दर्शकांची प्रवृत्ती असते. जर कादंबरी असली तर ह्या बेरजेची जागा वजाबाकी घेते. कौलांनी दोन्ही केले नाही. *आषाढ का एक दिन* मध्ये त्यांनी स्थळांची संख्या कायम ठेवली. पात्रे आणि घटना ह्यांच्या बाबतीत कोणत्याही प्रकारच्या बेरजावजाबाक्या केल्या नाहीत.

चित्रणशैलीबद्दल त्यांनी काही महत्त्वाचे निर्णय घेतले. त्यातला एक म्हणजे संपूर्ण चित्रणशैलीला अजंठ्याच्या बौद्ध भित्तिचित्रांचा आधार घेतला. त्यातल्या रेषांची वाहणी, अवयवांचे एकमेकांशी होणारे कोन, शरीरांतील अंतरे, ओव्हरलॅप्स, त्रिभंगाचा वापर आणि विशेषत: प्रकाशाच्या वापराची शैली - ज्याचे श्रेय त्यांच्यात आणि के०के० महाजन यांच्यात सारखे वाटावे लागेल - ह्यांचा वापर करून त्यांनी ह्या महान चित्रणशैलीमागची दृष्टी आपल्या सिनेशैलीचे स्फूर्तिस्थान म्हणून घेतली.

[ *ह्यातल्या एका शॉटच्या चित्रीकरणाच्या प्रत्यक्ष अनुभवाचे वर्णन करून मी आपल्याला या शैलीची कल्पना देण्याचा प्रयत्न करतो.*

*सिनेमाच्या भाषेत संध्याकाळच्या एका विशिष्ट वेळेला* ***मॅजिक अवर*** *असे म्हणतात. सूर्यास्ताच्या आधीचा काही पाच-दहा मिनिटांचा काल आणि अस्तोत्तर आकाशात त्याचे रेंगाळणारे मंद तेज जिथपर्यंत टिकते तो हा काल. ह्या कालात योग्यप्रकारे शूटिंग केल्यास त्याला एक सौम्य तेजाळपणा येतो. त्यात आकाश आणि त्याखालचा भूभाग हा*





अनुक्रमणिका

*सारख्याच तीव्रतेच्या प्रकाशात दिसतो. (एरवी आकाशातील प्रकाशाचे प्रमाण भूभागावरल्या प्रकाशापेक्षा खूपच जास्त असते.) शिवाय या प्रकाशाच्या रंगतपमान असणाऱ्या गुणांमुळे पदार्थांवर सोनेरी तजेला चढतो.*

*रेखा सबनीसच्या मल्लिकेच्या भूमिकेतल्या एका शॉटची तयारी चालली होती. ती मी लक्षपूर्वक पाहात होतो. रेखा निश्चल आहे आणि पार्श्वभूमीवर सूर्यास्त होत आहे, मग हळूहळू अंधार वाढतो, चेहऱ्यावरच्या सावल्या गर्द होतात असे त्या शॉटचे डिझाईन होते.*

*ह्या संपूर्ण चित्रपटाचा ध्वनी पूर्वमुद्रित होता. त्याचा प्लेबॅक सुरू झाला. कॅमेरा सुरू झाला. हळूहळू सूर्य अस्ताला जाऊ लागला. रेखाच्या चेहऱ्यावरच्या सावल्या दाट होऊ लागल्या. त्या निश्चल चेहऱ्यात बदलणाऱ्या प्रकाशामुळे विविध भाव तरळू लागले. केकेच्या बाऊन्स बोर्डवरून परावर्तित झालेला सौम्य छायारहित प्रकाश सूर्यास्तानंतर जास्त प्रभावी होऊ लागला आणि चेहऱ्याचा एकूण नूर पालटू लागला. शॉट सुमारे पाच मिनिटांचा होता; पण त्यातल्या सतत बदलणाऱ्या प्रकाशाने फ्रेममधल्या प्रत्येक वस्तूत आणि रेखाच्या चेहऱ्यात जे बदल होत होते ते पाहताना ही पाच मिनिटे लागलेली तंद्री 'कट' ह्या शब्दाने तुटली.* ]

**ऋत्विक घटक**

कौल यांनी ऋत्विक घटक यांचा उल्लेख केला आहे. ऋत्विकदांना व्यक्तिरेखा आणि तिची पार्श्वभूमी यांचा परस्परसंबंध दाखवायचा होता, इतकेच नव्हे तर त्यामधले अवकाश ताणून तो अधोरेखित करायचा होता किंवा त्याला अतिवास्तव स्वरूप द्यायचे होते. ***मेघे ढाका तारा*** हा अभिजात चित्रपट एका अत्यंत सामान्य कथानकावर आधारित आहे. तरीही ऋत्विकदांनी त्यातल्या प्रतिमा, ध्वनी आणि लय ह्यांच्या साहाय्याने जे काही केलेले आहे ते अलौकिक आहे. त्यातल्या प्रतिमांना शिल्पांची भव्यता आहे. त्यातले साऊंड इफेक्ट्स हे संगीताच्या विशेषत: ऑपेराच्या जवळ जातात.

काव्याचे लिरिक, नाट्य आणि महाकाव्य हे प्रमुख प्रकार आहे. ऋत्विकदांनी क्षोभनाट्य आणि महाकाव्य ह्या दोन प्रकारांपासून स्फूर्ती घेऊन आपली चित्रणशैली बनवली. क्षोभनाट्यातल्या अतिशयोक्तीकरता त्यांना वाईड अँगल लेन्सेसचा उपयोग झाला. त्यामुळे चित्रणाला रोजच्या जीवनापेक्षा मोठा असा आकार प्राप्त होतो. ह्या लेन्सेसची फोकल लेंग्थ कमी कमी करत नेऊन त्यांनी आपल्या शेवटच्या ***तिताश ॲकटी नोदीर नाम*** ह्या चित्रपटात ९.८ मिलीमीटर ह्या लेन्सचाही वापर केला. त्यामुळे सर्वसाधारण क्लोज-अपदेखील भव्य शिल्पासारखा दिसू लागला. चित्रण हे एका व्यक्तीच्या चेहऱ्याचे न होता त्याला एका आर्किटायपल प्रतिमेचे भव्यत्व आले.

**आजची परिस्थिती**

आजच्या सिनेमात ज्या कथनपद्धती वापरल्या जातात त्यात मल्टिपल नॅरेटिव्हचा मोठ्या प्रमाणावर उपयोग होतो आहे. किस्लोव्हस्कींच्या देकालॉग ह्या बायबलमधल्या दहा आज्ञांवर आधारित अशा मालिकेपासून ह्याची सुरुवात झाली. नंतर त्यांची ट्रिलजी *थ्री कलर्स* ही आली. *आमोरेस पेरोज*पासून चित्रपटाच्या व्यावसायिक प्रवाहात तिचा प्रवेश झाला. मराठीत कुंडलकरांचा *गंध* हा चित्रपट अशाच कथनपद्धतीवर आधारित आहे. साहित्यात मिलान कुंदेरांच्या *इम्मोर्टॅलिटी* या कादंबरीपासून या प्रवाहाला मोठ्या प्रमाणावर सुरुवात झाली. काळाची एक रेषा चित्रित न करता तिचे विविध प्रकारे खंडन करून मग तिला एका जिग्सॉ पझलप्रमाणे एकत्रित आणायचे हा या कथनपद्धतीचा शैलीविशेष.

या खेरीज माध्यमांतराचे काही नवीन प्रकार आपल्याला पाहायला मिळतात. सर्वसाधारण साहित्याकडून सिनेमाकडे होणारा प्रवास आता काही प्रमाणात उलटा होऊ लागलेला आहे. ग्राफिक कादंबऱ्या आणि पुस्तके लोकप्रिय होऊ लागल्यानंतर *सिन सिटी*सारख्या चित्रपटांची निर्मिती होऊ लागली आहे. आय-पॅडने वाचनाचे विविध प्रकार लोकप्रिय केलेले आहेत. आता सिनेमा बघण्याकरता लॅपटॉप कम्प्युटरची गरज नाही. आय-फोन आणि आय-पॅड ही तरुण पिढीची जगाशी संबंध ठेवण्याची साधने झाली आहेत.

आपल्या सेमिनारच्या विषयाशी या गोष्टींचा प्रत्यक्ष संबंध असला-नसला तरीही ही आजची वस्तुस्थिती आहे. ती डोळ्याआड करून साहित्यावरच्या कोणत्याही चर्चेला प्रसंगौचित्य राहणार नाही. आपण माध्यमांतराबद्दल बोलतो आहोत आणि माध्यमांतले अंतर कमी कमी होत पुसले जात आहे. माध्यमांतराच्या कल्पनेचे शेल्फ-लाइफ थोडेच बाकी राहिलेय की काय अशी शंका येते.

**पकड**

माध्यमांतराच्या संबंधीच्या ह्या बीजभाषणाचा शेवट करताना मला एक महत्त्वाची गोष्ट सांगावीशी वाटते. ती म्हणजे माध्यमांतर करणाऱ्या दिग्दर्शकाला पकड असणे जरुरीचे असते. ती पकड साहित्यावर आणि सिनेमावर असायला हवी. ही पकड जर मिळाली तर कोणतेही नियम पाळण्याची आवश्यकता नसते आणि ती जर मिळाली नाही तर अगदी शब्दशः प्रामाणिक राहून केलेले माध्यमांतर म्युझिअममधल्या ममीसारखे हुबेहूब असेल; पण त्यात प्राण नसतील.

विविध कलांचा विचार करताना त्यांना वेगवेगळ्या मानून करणे हे काही प्रमाणात सयुक्तिक आहे आणि रास्तही आहे. पण ते जेवढ्यास तेवढे. सर्व कला एकमेकींत कशा आत शिरल्या आहेत आणि एकीचा प्रयोग किंवा विचार करायला गेले की त्या

सगळ्या समोर उभ्या राहतात हे एक अटळ सत्य आहे. म्हणून या भाषणाचा शेवट विष्णुधर्मोत्तर पुराणातल्या वज्र आणि मार्कंडेयाच्या कथेने करतो.

राजा वज्र मार्कंडेय ऋषींना त्यांनी आपल्याला शिष्य म्हणून स्वीकारावे अशी विनंती करतो. त्यांनी मूर्तिकला शिकवावी, म्हणजे आपल्याला देवतांच्या योग्य रूपात त्यांची पूजा करता येईल अशी वज्राची इच्छा असते. मुनी म्हणतात की, चित्रकलेचे ज्ञान झाल्याखेरीज मूर्तिकला येणार नाही. मग राजा चित्रकला शिकवण्याची त्यांना विनंती करतो. तेव्हा मुनी त्याला सांगतात की, तो उत्तम नर्तक झाल्याखेरीज त्याला चित्रकला येणार नाही. राजा नृत्य शिकवण्याची विनंती करतो. तेव्हा मुनी सांगतात की, लयीचे भान असल्याखेरीज आणि वादनकलेचे योग्य ज्ञान झाल्याखेरीज त्याला नृत्य येणार नाही. मग राजा ह्या दोन्हींचे ज्ञान देण्याची ऋषींना विनंती करतो. तेव्हा ते त्याला सांगतात की, गेय संगीतावर प्रभुत्व असल्याखेरीज वाद्यसंगीत येणार नाही. शेवटी ह्या सर्व पायऱ्या ओलांडून राजा मूर्तिकला शिकतो. (विष्णुधर्मोत्तरपुराण ३.२.१)

[*मुंबई विद्यापीठाने आयोजित केलेल्या 'साहित्यकृतींचे माध्यमान्तर' या विषयावरील चर्चासत्रातील बीजभाषण. ७ एप्रिल २०११* ]

■

**उसंत?**

मराठीतील बहुशः लेखन - मग ती कथा-कादंबरी-कविता असो वा विचारनिबंध असो - कालचा आढावा घेतं, भूतकाळाचं विश्लेषण मांडतं, परंतु 'आज-आत्ता' ला भिडत नाही. गेल्या आठ-पंधरा वर्षांतल्या मोठ्या कृतींच्या परीक्षणांतून हे दाखवता येईल. माणसामाणसांतील संबंध आणि मनुष्यजीवनाचा अर्थ यांचा शोध हा जर लेखनामागील हेतू असेल तर मला वाटतं, की ग्रंथमाध्यमाची गाडी केव्हाच सुटून गेली आहे! माणसाला आता ती पुन्हा पकडता येणार नाही. उगाच नाही आजच्या समाजाचं 'पेपरलेस सोसायटी' असं वर्णन करत! सभोवताल समजावून घेणं, व्यक्तिगत अनुभूतीत रिचवणं आणि प्रातिनिधिक स्वरूपात वेधक शैलीत मांडणं ही जी लेखनप्रक्रिया सांगितली जाते, त्यासाठी संवेदनाशील माणसाला उसंतच उरलेली नाही; इतका काळ झपाट्यानं पुढे चालला आहे.

- दिनकर गांगल

(अध्यक्षीय भाषण, कोकण मराठी साहित्य संमेलन, रोहा)





अनुक्रमणिका

# भारत - एक भाषिक क्षेत्र

**एम्०बी० एमिनो**

( Emeneu, M.B. 1956 'India as a Linguistic Area', *Language* vol.32, pp. 3-16 या संशोधनात्मक निबंधाचे भाषांतर)

भाषांतर : **मिलिंद मालशे आणि विवेक भट**

ज्या अमेरिकन मानववंशवैज्ञानिकांनी भाषाविज्ञानाचाही व्यासंग केलेला आहे त्यांचा भाषाविज्ञानाकडे पाहण्याचा दृष्टिकोन सहिष्णु राहिलेला आहे. त्यात बौझ, सपीर आणि अर्थातच *लँग्विज*चा हा अंक ज्यांच्या सन्मानार्थ निघतो आहे ते आल्फ्रेड एल्. क्र्योबर[भा१] यांचा उल्लेख मी करू इच्छितो. या मंडळींनी अमेरिका खंडातील वर्णनात्मक भाषाविज्ञानाच्या परंपरेमध्ये बरीच भर घातली. मात्र यापैकी कोणीही ऐतिहासिक समस्यांकडे दुर्लक्ष केलेले नाही. प्रत्येकाने आपापल्या परीने आणि पूर्णपणे विभिन्न अशा भूमिकांमधूनही विवाद्य मुद्यांविषयी विवेचन करून विशेषत: उत्तर अमेरिका उपखंडातील भाषांच्या उत्पत्तीविषयक प्रश्नांबाबतच्या संशोधनामध्ये मोठी भर घातली आहे, त्याचप्रमाणे काही सर्वसामान्य प्रश्नांची चर्चाही केली आहे. जगामध्ये जेथे जेथे भाषिक चित्र गुंतीगुंतीचे आहे तेथे या सर्वसामान्य प्रश्नांपैकी एक प्रश्न पुन्हा पुन्हा उद्‌भवतो. क्र्योबर यांच्या सन्मानार्थ या प्रश्नाविषयीच्या चर्चेमध्ये मी काही भर घालण्याचा प्रयत्न करणे हे उचित ठरेल.

उत्पत्तिनिष्ठ सीमारेषा ओलांडून काही भाषिक वैशिष्ट्यांचा प्रसार (डिफ्युजन) कसा होतो हा तो प्रश्न होय. बौझ यांनी हा प्रश्न अनेक ठिकाणी उपस्थित केला. (तो उपस्थित करणारे तेच पहिले होते की नाही, हा मुद्दा फारसा महत्त्वाचा नाही, कारण या ठिकाणी मला सूचीशास्त्रदृष्ट्या परिपूर्ण अशी भूमिका मांडणे अभिप्रेत नाही.) हा प्रश्न बौझ यांनी ***अमेरिकन अँथ्रपॉलॉजिस्ट*** (२२.३६७-७६,१९२०), आणि ***लँग्विज*** (५.१-७,१९२९) या त्यांच्या लेखनात, आणि विशेषत: ***हॅण्डबुक अव्ह अमेरिकन इंडियन लँग्विजिझ्*** या ग्रंथाची प्रस्तावना (१.४७-५३) (BAE, Bull. 40 Part1; Washington, 1911), येथे मांडला. त्यांचा एक निष्कर्ष असा होता की 'उत्तर अमेरिका खंडाच्या पॅसिफिक किनारपट्टीवरील अनेक स्थानिक भाषांमध्ये संरचना व शब्दनिधी यांत मूलभूत भेद असूनही विशिष्ट व्याकरणिक घटकांच्या बाबतीत लक्षणीय स्वरूपाची साम्ये

आपल्याला आढळतात. या व्याकरणिक घटकांचे वितरण अशा प्रकारे झालेले असते की शेजार-शेजारच्या भाषांमध्ये लक्षणीय साम्य निर्माण होते. ... परस्परांना लागून असणाऱ्या प्रदेशांमध्ये व्याकरणिक प्रक्रियांचा प्रसार होत असतो असे मानल्याखेरीज या घटिताचे स्पष्टीकरण देणे जवळजवळ अशक्यच वाटते.' (Lg.5.6). याआधीच्या विवेचनात त्यांनी असे गृहीत धरले होते की शब्दांची उसनवारी होऊ शकते आणि बहुधा स्वनात्मक गुणधर्मांचीही उसनवारी होऊ शकते, यावर सर्वसामान्यपणे एकमत असते (व असे एकमत निश्चितपणे आहेच). पदिमव्यवस्थेचासुद्धा प्रसार होऊ शकतो, हे दाखवून देण्याचा त्यांचा विशेष प्रयत्न होता, आणि त्यासाठी त्यांनी जी अनेक उदाहरणे शोधून काढली ती पटण्यासारखी आहेत. आपल्या दृष्टीने त्यांच्या हाताळणीतील हा एक महत्त्वाचा भाग आहे. 'भाषांचे संकरीकरण' (हायब्रिडायझेशन ऑफ लँग्विजिस) याविषयी त्यांनी केलेली सिद्धांताची एकूण मांडणी स्वीकारणे हे त्या मानाने जरा अधिक अवघड आहे, कारण ही मांडणी काहीशी अतिसुलभ, ढोबळ आणि प्रथमदर्शनी स्पष्टपणे न दिसणाऱ्या उत्पत्तिनिष्ठ संबंधांकडे दुर्लक्ष करणारी आहे (असे दुर्लक्ष बौझ यांनी केले, हे आपल्याला माहीत आहे), परंतु ही गोष्ट सध्या आपल्या दृष्टीने फारशी महत्त्वाची नाही.

सपीर यांनी या प्रश्नाचा विचार *लँग्विज* (१९२१) या ग्रंथामध्ये, विशेषतः नवव्या प्रकरणात (पृ० २०५-२०), केलेला आहे. बौझ यांच्यापेक्षा सपीर यांच्या उदाहरणांची व्याप्ती बरीच अधिक आहे; त्यांचा भाषावैज्ञानिक अनुभव खूपच मोठा होता व त्यातील साधनसामग्रीमधून त्यांनी आपली उदाहरणे घेतलेली आहेत. शब्दांची उसनवारी ही गोष्ट नेहमीचीच आहे, हे बौझ यांच्याप्रमाणेच सपीर यांनीही मान्य केले होते. मात्र शब्दांची उसनवारी स्वीकारण्याची वेगवेगळ्या भाषांची क्षमता कशी वेगवेगळी असते याची चर्चाही सपीर यांनी केलेली आहे. शिवाय स्वनात्मक गुणधर्मांची उसनवारीही त्यांना मान्य होती. सामाजिक पातळीवर या परिवर्तनाचे वाहक असणाऱ्या द्विभाषिक व्यक्तींना सपीर यांनी आपल्या विवेचनात स्थान दिले. स्वनात्मक उसनवारी ही यादृच्छिक नसते; भाषेचा 'स्वनात्मक कल' (फनेटिक ड्रिफ्ट) हा जणू एखाद्या 'नियंत्रका'प्रमाणे (गव्हर्नर) या उसनवारीला नियंत्रित करीत असतो, यावर सपीर ठामपणे भर देत होते. पुढील लेखनात पदिमव्यवस्थेकडे वळल्यावर त्यांची भूमिका काय राहिली असेल याची पूर्वसूचनाच यातून मिळते, हे अधिक महत्त्वाचे आहे : 'सुट्या ध्वनींचे नव्हे तर स्वनांच्या आकृतिबंधाचे रक्षण करणे ही गोष्ट जोवर भाषेत स्वनपातळीवर महत्त्वाची असते तोवर परक्या ध्वनींना सामावून घ्यायला अबोध पातळीवर नकार देण्याचे भाषेला काहीच कारण नसते. मात्र हे परके ध्वनी असे असतात की त्यांनी व्यक्तिगत पातळीवरील परिवर्तनाच्या क्षेत्रात यशस्वीपणे शिरकाव केलेला असतो. परंतु ही नवी परिवर्तने (किंवा जुन्या परिवर्तनांचे नवे अवतार) ही भाषेचा मूळ स्वनात्मक कल सांभाळतात' (पृ० २१४). तेव्हा या

प्रकारची उसनवारी बिनशर्तपणे करायला मूलतः भाषा राजी नसते, मात्र काही विशिष्ट शर्ती पाळल्या तर ही उसनवारी भाषा मान्य करते, असे दिसते. उसनवारीच्या या शर्ती सपीरप्रणीत मांडणीनुसार नेहमीच दाखविता येतील का, हे उपलब्ध असणाऱ्या ऐतिहासिक पुराव्यावर अवलंबून राहील. (त्याचप्रमाणे अर्थात संशोधकाच्या कौशल्यावरही अवलंबून राहील.) आजचे संरचनावादी संशोधक ही पद्धत अनुसरतात हे निःसंशय. सपीर यांनी याच प्रकरणाच्या अखेरच्या भागामध्ये (पृ० २१५-२०) पदिमव्यवस्थेच्या पातळीवरील उसनवारीचे विश्लेषण केलेले आहे. त्यांचा युक्तिवाद पुढीलप्रमाणे आहे : फ्रेंच, लॅटिन व ग्रीक या भाषांमधून इंग्लिश भाषेने काही विशिष्ट प्रत्ययांची उसनवारी केलेली आहे (उदा० -ess, ize, -able), परंतु हे प्रत्यय आधीच अस्तित्वात असणाऱ्या प्रत्ययांच्या यादीत केवळ भर घालतात, व त्यामुळे ही उसनवारी शब्दांच्या उसनवारीपेक्षा फारशी वेगळी नाही. 'भाषेच्या पायाभूत रचनेवर' त्यांचा काहीही परिणाम होत नाही. सामान्य निष्कर्ष काढायचा तर तो पुढीलप्रमाणे निघेल : 'कोठेही (म्हणजे कोणत्याही भाषेत) वरवरच्या पदिमात्मक परस्पर प्रभावांपेक्षा वेगळे असे काही आढळत नाही.' सपीर थोडक्यात असे म्हणतात : 'यावरून बरेच निष्कर्ष काढता येण्यासारखे आहेत, त्यांपैकी एक म्हणजे पदिमव्यवस्थेच्या बाबतीत एका भाषेचा दुसऱ्या भाषेवर सखोल प्रभाव पडणे ही गोष्ट कदाचित अशक्य कोटीतील नसेलही, परंतु ही प्रक्रिया अत्यंत धीमी असते. भाषिक इतिहासाचा निरीक्षणासाठी उपलब्ध असणारा भाग सापेक्षतः छोटासाच असतो व त्यामध्ये पदिमव्यवस्थेच्या प्रभावाला सामावून घेतले जाण्याची शक्यता या प्रक्रियेच्या धीमेपणामुळे जवळजवळ नसतेच. किंवा, पदिमव्यवस्थेमध्ये सखोल असे व्यत्यय बाह्य घटकांमुळे घडून येण्यासाठी अनुकूल अशी विशिष्ट परिस्थिती आवश्यक असते, उदा० एखाद्या भाषिक वर्गाची खास स्वरूपाची अस्थिरता किंवा सामान्यतः आढळात न येणारा असा सखोल सांस्कृतिक संपर्क - या प्रकारची परिस्थिती आपल्या (लिखित स्वरूपाच्या) कागदपत्रांच्या सामग्रीत दृश्यमान होऊ शकत नाही. किंवा आणखी एक निष्कर्ष म्हणजे एक भाषा दुसरीवर पदिमव्यवस्था पुनर्रचित करणारा प्रभाव सहजपणे टाकू शकते असे गृहीत धरण्याचा आपल्याला अधिकार नाही.' पदिमव्यवस्थेत आढळणाऱ्या साम्याच्या काही उदाहरणांबाबत सपीरने असे दाखवून दिले की ही साम्ये म्हणजे भाषांमधील कुलनिष्ठ संबंधांचे अवशेषच असतात. या निष्कर्षाचा मुक्तपणे वापर करण्याची त्यांची तयारी होती (उत्तर अमेरिका खंडातील भाषांमागे असणाऱ्या मूळ शब्दनिधींची रचना करताना त्यांनी या निष्कर्षाचा असा मुक्त वापर केलेला दिसतो.) शेवटचा मुद्दा असा की प्रसाराविषयी सपीर यांनी अशी भूमिका घेतली की, 'प्रसारामुळे एका भाषेच्या पदिमव्यवस्थेवर दुसऱ्या भाषेचा सखोल प्रभाव पडतो याची खरोखर पटण्याजोगी अशी उदाहरणेच मिळत नाहीत', आणि भाषेच्या स्वरूपाविषयी त्यांची भूमिका अशी होती





अनुक्रमणिका

की 'सामाजिक घटितांपैकी भाषा हे सर्वात स्वयंपूर्ण आणि बदलांना सर्वात अधिक विरोध करणारे घटित आहे.' बौझ आणि सपीर यांच्या भूमिका परस्परविरोधी होत्या हे सुपरिचित आहे, आणि या बाबतीत तर हे स्पष्टपणे दिसून येते : भाषांच्या कुलनिष्ठ संबंधांविषयी बौझ साशंक होते. सपीर यांची १९२१मधील भूमिका ही त्या भूमिकेला दिलेली प्रतिक्रिया होती. सपीर यांच्या विवेचनाचा प्रतिवाद बौझ यांनी १९२९ मधील एका लेखामध्ये तर अप्रत्यक्षपणे केला. पदिमव्यवस्थेवरील प्रभाव एकतर 'पृष्ठस्तरीय' असतो किंवा 'सखोल' असतो, असा भेद सपीर यांनी केलेला आहे, हा भेद वरवर पाहता आकर्षक वाटला तरी तो अत्यंत व्यक्तिनिष्ठ आहे आणि विशिष्ट उदाहरणांना तो लागू करणे कठीण आहे. समान पुरावासामग्री हाती असूनही या भेदाच्या बाबतीत संशोधकांमध्ये निःसंशयपणे मतभेद होतील, आणि दूरगामी विचार करता हा भेद वापरण्याजोगा ठरणारही नाही, कारण तो मूल्यमापनात्मक आहे, गणनीय नाही.

अमेरिकेत सपीर यांच्या भूमिकेचा मोठ्या प्रमाणात स्वीकार झालेला आहे. क्रयोबर यांनी १९४० मध्ये लिंग्विस्टिक सोसायटीपुढे केलेल्या अध्यक्षीय भाषणामध्ये (*Language* 17.287-91 [1941]) असे म्हटले की 'विविध भाषांमध्ये शब्दांची उसनवारी मुक्तपणे होत असते, आणि व्याकरणाची उसनवारी झालीच तरी ती मोठ्या प्रयासाने होते' हे एक 'नित्यतत्त्व आहे'. होयर (Hoijer)(*Language* 24.335 [1948]) म्हणतात : 'भाषेच्या गुणधर्मांची उसनवारी सहजपणे होत नाही' याउलट युरोपमध्ये बौझप्रणीत भूमिका अधिक स्वीकारली गेली आहे असे दिसते. (तुळा : Sebeok, *Lingua* 2.136ff [1949-50] आणि तेथे दिलेली संदर्भसूची; N.S. Trubetzkoy, *Acta linguistica*, 1.81-9 [1939]; Roman Jakobson, *International Journal of American Lingustics IJAL* 10.193 [1944]; इत्यादी). शिवाय, अमेरिकेतही सपीरप्रणीत भूमिका पूर्णपणे कधीच सोडून देण्यात आलेली नाही. लेनर्ड ब्लूमफिल्ड यांनी *Language* (1933 : 468-71) या ग्रंथात तिला निश्चितच पाठिंबा दिला आहे. क्रयोबर (तत्रैव 290) यांचे मत असे होते की 'सपीर यांच्या या तत्त्वाची फेरतपासणी करण्याची वेळ आलेली आहे.' मेलनीझिअन भाषकांनी मलायो-पॉलिनीझियन भाषेकडून शब्दनिधीपेक्षा आकारिक रचनांची उसनवारी अधिक प्रमाणात केली, या रे यांच्या अभ्युपगमाच्या प्रभावाखाली क्रयोबर यांनी हे विधान केले. या विशिष्ट प्रश्नाचे अचूक उत्तर काहीही असले तरी त्यामागच्या सामान्य समस्येच्या पूर्तीसाठी अधिक पुरावा उपयुक्तच ठरावा. या दृष्टीने वाटचाल करण्यासाठी मोठी काल-कक्षा असणारे ऐतिहासिक परीक्षण करता येईल अशा प्रकारची पुरावा-सामग्री जमविणे आवश्यक आहे. भारतामधून अशा प्रकारची सामग्री मिळते. त्यातली काही सामग्री आधीच्या संशोधकांनी या दृष्टिकोनातून तपासलेली आहे; परंतु केवळ भारतविद्येशी संबंधित

माध्यमांकडून ती प्रकाशित झालेली असल्याने सामान्य भाषाविज्ञानाच्या प्रांतामध्ये तिचा फारसा प्रभाव पडलेला नाही[१]. आपण करू पाहात असलेली फेरतपासणी कदाचित अधिक यशस्वी ठरेल.

भारतीय उपखंडात[२] इंडो-आर्यन (हे इंडो-युरोपियन भाषाकुलाचे उपकुल आहे), द्रविड व मुंडा या तीन प्रमुख भाषाकुलांतील भाषा बोलणारे लोक खूप मोठ्या संख्येने राहतात. १९३१मध्ये इंडो-आर्यन भाषाकुलाचे सुमारे २५.५ कोटी भाषक होते. १९५१ पर्यंत त्यांची संख्या ३३ कोटी झाली असावी. १९५१मध्ये द्रविड भाषाकुलाचे भाषक सुमारे ९ कोटी होते, तर मुंडा भाषाकुलाचे सुमारे ५० लाखांपेक्षाही अधिक असावेत. या भौगोलिक प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या सर्वच भाषांचा अंतर्भाव या खानेसुमारीत होत नाही. गिलगिटमध्ये बुरुशास्की-भाषक आहेत, आसामच्या पर्वतराईच्या प्रदेशामध्ये खासी-भाषक आहेत, हिमालयात व आसाममध्ये तिबेटो-बर्मीज गटातील अनेक भाषा बोलणारे लोक आहेत. त्याशिवाय निकोबारीज व अंदमानीज या भाषा बोलणारेही लोक आहेत. आपण येथे इंडो-आर्यन, द्रविड व मुंडा या भाषाकुलांचाच प्रामुख्याने विचार करणार आहोत.

इंडो-आर्यन व द्रविड भाषाकुलांविषयी आपल्यापाशी ऐतिहासिक ज्ञानाचा बराच साठा आहे. इंडो-आर्यन भाषाकुलातील महत्त्वाची भाषा म्हणजे संस्कृत. इ०स० पूर्व २००० वर्षांपासून संस्कृत भारतामध्ये आहे व तिच्यासंबंधी नोंदविलेली पुरावा-सामग्री प्रचंड आहे. मध्यकालीन इंडो-आर्यन व तिचे अनेकविध भाषाभेद संशोधकांना सुपरिचित आहेत, तर आधुनिक इंडो-आर्यन आणि तिच्यातून निघालेल्या डझनाहूनही अधिक प्रमुख भाषा व त्यांच्या असंख्य स्थानिक बोली यांच्याशीही संशोधक बऱ्यापैकी परिचित आहेत. चार साहित्यिक द्रविड भाषांपैकी तमिळमध्ये किमान दोन हजार वर्षे पुरातन अशी पुरावा-सामग्री खूप मोठ्या प्रमाणात उपलब्ध आहे. या चार भाषा तर सुपरिचित आहेतच; शिवाय द्रविड भाषाकुलात आणखी १५ वा १६ साहित्येतर भाषा आहेत व त्यांची थोडी फार नोंद संशोधकांनी घेतलेली आहे. मुंडा भाषाकुलात सुमारे डझनभर भाषा या साहित्येतर भाषा असून त्या फारशा परिचित नाहीत; मात्र त्यांच्यापैकी काहींची प्राथमिक वर्णने उपलब्ध आहेत व ती बरीच माहितीपूर्ण आहेत.

या तीन भाषाकुलांमधील ऐतिहासिक संबंधांची मुख्यत: पुनर्रचना करावी लागते. मध्य भारतातील या तीन भाषाकुलांच्या भौगोलिक सीमांवरून असे दिसते की इंडो-आर्यन भाषाकुलाचा विस्तार होण्याआधी (बऱ्याच काळापासून) द्रविड भाषाकुलाची उत्तर-सीमा दक्षिणेकडे सरकते आहे. द्रविड भाषाकुलाच्या मुख्य सीमारेषेच्या उत्तरेकडे असणारे छोटे प्रादेशिक खंड हे एकमेकांपासून विलग आहेत व अजूनही तग धरून आहेत. मुंडा भाषाकुलाबाबतही तेच आढळते. या भाषाकुलाच्या सुट्या खंडांना द्रविडी किंवा

इंडो-आर्यन भाषांनी वेढून कमीअधिक प्रमाणात चेपून टाकलेले आहे. याचा अर्थ असा की आधीच्या कालखंडात मुंडा व द्रविडी भाषा यांचा विस्तार बराच असावा. संस्कृतच्या शब्दनिधीमध्ये इंडो-युरोपीय नसणारे जे घटक आहेत त्यांच्या अभ्यासावरून निश्चितपणे असे दिसते की संस्कृतची नोंद सर्वप्रथम ज्या काळात आढळते त्या काळात, म्हणजे ऋग्वेद-काळात, संस्कृत-भाषक लोक पंजाबच्या पलीकडे पूर्वेला पोहोचले नव्हते; त्या काळात संस्कृतमध्ये काही द्रविडी शब्द रुळलेले होते. याचा अर्थ असा की, तीन हजार वर्षांपूर्वी द्रविडी बोली या भागात प्रचलित असाव्यात. याचा आणखी एक अर्थ असा होतो की त्या काळात बहुभाषिकता रूढ असावी आणि एका खूप मोठ्या कालखंडात व खूप मोठ्या प्रदेशात हळूहळू द्रविडी बोलींचा त्याग करून इंडो-आर्यन बोली लोकांनी स्वीकारल्या असाव्यात. या प्रक्रियेविषयी आपल्यापाशी असलेला पुराव्याचा तपशील अत्यंत तुटपुंजा आहे.[४] इंडो-आर्यन व मुंडा बोली, तसेच द्रविडी बोली व मुंडा बोली, या जोड्यांमध्येही याच प्रकारचे संबंध अस्तित्वात असले पाहिजेत. यापैकी कुठल्याही संबंधांची तपशीलवार मांडणी करणे आजही जवळजवळ अशक्य आहे.

या तीन भाषाकुलांमध्ये झालेल्या शब्दांच्या उसनवारीच्या प्रश्नाचा केवळ उल्लेखच येथे पुरेसा आहे. सर्वच द्रविडी भाषांमध्ये अनेक इंडो-आर्यन शब्द आढळतात; व ही उसनवारी संस्कृत, मध्य-कालीन इंडो-आर्यन, आणि आधुनिक इंडो-आर्यन या सर्व भाषांतून सर्वच कालखंडांमध्ये झालेली दिसते. त्याचप्रमाणे मुंडा भाषांमध्येही इंडो-आर्यनची बरीच सामग्री आढळते. आपल्याशी उपलब्ध असणाऱ्या पुराव्यावरून ही उसनवारी प्रामुख्याने आधुनिक इंडो-आर्यनमधून झाली असावी असे दिसते; मात्र यातही अर्थातच संस्कृत रूपांचाही अंतर्भाव आहे; कारण आधुनिक इंडो-आर्यन भाषांनी संस्कृतमधून बरीच उसनवारी केलेली आहे. इंडो-आर्यन भाषांनी द्रविडी भाषांमधून उसनवारी केलेली आहे, हेही स्पष्ट आहे. टी.बरो यांनी **दि संस्कृत लँग्विज** या ग्रंथामध्ये (१९५५ : ३७९-८८) वानगीदाखल काही उदाहरणे दिली आहेत आणि कालक्रमाविषयी एक भूमिका मांडली आहे.[५] द्रविडी भाषांचा इंडो-आर्यनवरचा हा प्रभाव ख्रिस्त-पूर्व कालखंड संपेपर्यंत ओसरून गेला होता, हे उल्लेखनीय आहे, व यावरून उत्तर भारताच्या भाषिक इतिहासावर प्रकाश पडतो : या काळापर्यंत गंगेच्या खोऱ्यामध्ये द्रविडी बोली जवळजवळ नाहीशा झाल्या असाव्यात. मुंडा भाषांमधून इतर दोन भाषाकुलांतील भाषांमध्ये उसनवारी निश्चितच झाली असावी; मात्र तिची स्वरूपनिश्चिती करता येणे अवघड आहे. (बरो, पृ० ३७७-७९).

या संदर्भात शब्दांव्यतिरिक्त इतर घटकांची उसनवारी अधिक लक्षणीय आहे. अगदी प्रारंभ-काळातील संस्कृत संहितांमध्येही ऐतिहासिकदृष्ट्या इंडो-युरोपीय नसणारे घटक आढळतात. हे घटक द्रविडी भाषांमधील घटकांशी साम्य असणारे होते व काळ जसा

पुढे गेला तसतसे या प्रकारचे अधिकाधिक घटक इंडो-आर्यनमध्ये येत गेले, ही गोष्ट मान्य होऊन आता बराच काळ लोटला आहे.

*L'indo-aryen du Veda aux temps modernes (1934)* या आपल्या ग्रंथाच्या शेवटच्या प्रकरणामध्ये ज्यूल ब्लोक[भा२] यांनी त्यांना माहिती असलेल्या या प्रकारच्या सर्व घटकांचे संकलन करून त्यांची चर्चाही केलेली आहे. (पृ० ३२१-३१).[६] मी या मुद्यांची चर्चा करणार आहे आणि त्यात अधिकाधिक तपशिलाची भर घालणार आहे. या संदर्भात तीन सर्वसामान्य प्रवृत्ती येथे दिसू लागतात : (अ) इंडो-आर्यनचे विशिष्ट प्रकारे ''भारतीयीकरण'' होणे, किंवा (आ) तिन्ही प्रमुख भाषाकुलांतील ज्या भाषा प्रादेशिक दृष्ट्या निकट आहेत त्यांच्यामध्ये काही वेळा एखादा गुणधर्म दिसून येणे (हे सर्वच भाषांमध्ये होत नाही), मात्र हे गुणधर्म मुळात कोणत्या भोषत होते, हे निश्चित करणे शक्य नसणे, किंवा (इ) परिस्थिती (आ) प्रमाणेच असते; परंतु या प्रकारे दिसून येणाऱ्या गुणधर्मांचे मूळ पुराव्यानिशी सांगता येणे.

भारतातील बहुतेक भाषांमध्ये, मग त्या कोणत्याही प्रमुख भाषाकुलांतील असोत, मूर्धन्य (रेट्रोफ्लेक्स, सेरिब्रल किंवा डोमल) व्यंजने दंत्य व्यंजनांपासून वेगळी असलेली आढळतात. मूर्धन्य व्यंजनांच्या वर्गामध्ये स्फोटक व नासिक्य व्यंजने निश्चितच अंतर्भूत असतात, तर काही भाषांत ऊष्मवर्ण (सिबिलंट्स), पाश्र्वस्थवर्ण (लॅटरल्स), कंपितवर्ण (ट्रेम्युलंट्स) व इतरही काही ध्वनी समाविष्ट असतात. इंडो-आर्यन, द्रविड, मुंडा आणि उत्तरेच्या अगदी टोकाची बुरुशास्की यांचा या स्वनात्मक घटकाच्या आधारे एक सुनिश्चित प्रवर्ग बनतो. हा स्वनात्मक घटक मुळात आदि-मुंडा मध्ये नसावा; कारण 'सोरा' या मुंडा भाषाकुलातील भाषेत मूर्धन्य ध्वनी नाहीत आणि बहुधा ही भाषा प्रागैतिहासिक (आर्केइक) असावी (पाहा : बरो, पृ० ९५). संस्कृतमधील अगदी सर्वात प्राचीन पुरावा-सामग्रीमध्येसुद्धा या प्रवर्गातील स्वनिम आढळतात, मात्र इंडो-युरोपिअनच्या इतर शाखांमध्ये ते आढळत नाहीत; तेव्हा हे ध्वनी मुळात आदि-इंडो-युरोपीय निश्चितच नाहीत. संस्कृतमध्ये मूर्धन्य ध्वनी काही वेळा विशिष्ट स्वनात्मक परिसरामध्ये उद्भवतात (कंडिशंड), तर इतर काही वेळा ऐतिहासिक दृष्ट्या इंडो-युरोपिअनमधील काही व्यंजने व व्यंजन-संयुगे (कॉन्सोनंट क्लस्टर्स) यांच्यात परिवर्तन होऊन हे ध्वनी उद्भवतात, असे त्यांचे स्पष्टीकरण देता येते. याउलट द्रविड भाषाकुलाचा विचार केला तर आदि-द्रविड भाषेमध्ये मूर्धन्य व दंत्य ध्वनी हे वैधर्म्यवाचक होते, विशिष्ट स्वनात्मक परिसराचा परिपाक म्हणून ते निर्माण झाले नव्हते, असे अगदी निश्चितपणे म्हणता येते. शिवाय, दक्षिणी द्रविड भाषांपैकी अनेक भाषांमध्ये मुखविवराच्या पुढच्या भागात निर्माण होणाऱ्या तीन स्वनिमांची मालिकाच आढळते : दंत्य, दंतमूलीय, आणि मूर्धन्य. ही शक्यता आंतरराष्ट्रीय स्वनलिपी रचणाऱ्या संशोधकांच्या लक्षातच आलेली नव्हती. आदि-द्रविडमध्ये या प्रकारचे

स्वनिमिक भेद असावेत असे तुलनात्मक पुराव्यावरून दिसते. द्रविड भाषांमध्ये ही परिस्थिती आहे; त्यावरून नि:संशयपणे असे निष्पन्न होते की, इंडो-युरोपिअन सामग्रीमधून संस्कृतमधील मूर्धन्य ध्वनी हाती लागत असले तरी वस्तुत: इंडो-आर्यन व द्रविडी भाषांच्या पूर्वी अस्तित्वात असणाऱ्या द्वैभाषिकतेमुळे इंडो-आर्यनच्या पूर्वीच्या भाषांमध्ये जी स्वनांतरे (ॲलोफोन्स्) होती त्यांचेच पुनर्वितरण होण्यासारखी परिस्थिती निर्माण झाली व (इंडो-आर्यनमध्ये) मूर्धन्य स्वनिम निर्माण झाले. काळ जसजसा पुढे सरकला तसतशी मध्यकालीन इंडो-आर्यनमध्ये या प्रकारच्या स्वनिमांची संख्या प्राचीन इंडो-आर्यनपेक्षा वाढत गेली यात शंकाच नाही; आणि आधुनिक इंडो-आर्यनमध्ये तसेच घडले. भारतीय उपखंडातील भाषिक क्षेत्रामधील इंडो-युरोपिअन घटकाच्या भारतीवीकरणाचे हे एक स्पष्ट उदाहरण आहे, हे निश्चित.

आता आपल्याला स्वनिमव्यवस्थेच्या पातळीवरील अधिक मर्यादित स्वरूपाच्या परस्पर-प्रभावाच्या एका उदाहरणाचा विचार करता येईल. हे उदाहरण बोलीभेदांची क्षेत्रमर्यादा दर्शविणाऱ्या एका भौगोलिक रेषेचे (आयसोग्लॉसचे) आहे व त्यासाठी ऐतिहासिक स्पष्टीकरण अजून तरी हाती लागलेले नाही. प्राचीन इंडो-आर्यनमधील तालव्य घर्षस्फुट (पॅलटल ॲफ्रिकेट) ध्वनींचे रूपांतर मराठीमध्ये अग्र स्वरांपूर्वी च् /tš/ आणि ज्/dž/ असे होते आणि पश्च स्वरांपूर्वी च़/ts/ आणि ज़ /tz/ असे होते[भा३]. स्वनवितरणाच्या या नियमाला अनेक अपवाद आढळतात (कारण संस्कृतमधून अलीकडे झालेल्या उसनवारीमध्ये (सर्वच स्थानी) फक्त च्/tš/ ज् /dž/ आढळतात; तसेच अपवादांना इतर कारणेही आहेत.) हे अपवाद इतक्या मोठ्या प्रमाणावर आहेत की (मराठीत) या स्वनिमांचे दोन वेगळे संच मानण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. याचप्रकारचे वितरण दक्षिणी ओडिया भाषेत (इंडो-आर्यन भाषाकुल; LSI 5.2.379), तेलुगुमध्ये व उत्तर कानडीमध्येही सापडते (द्रविड भाषाकुल T.N. Sreekantaiya, Affricates in Kannada speech, *Indian Linguistics* 1954.83-90) आणि ब्लोकच्या म्हणण्यानुसार कोर्कू (मुंडा भाषाकुल) या भाषेतही हेच आढळते. (*LSI* 4.169; मात्र येथील वितरण पूर्णपणे अनिश्चित आहे). या भाषा मध्यभारतामधील एक सलग प्रदेश व्यापतात, आणि वर उल्लेखिलेल्या स्वनवैशिष्ट्याचा उगम प्रथम एका भाषेत झाला व नंतर तेथून तो इतर भाषांमध्ये पसरला, हे निश्चित. अर्थात मी आधी म्हटल्याप्रमाणे या घटकाच्या उगमाची भाषा कोणती हे सांगता येणार नाही. मात्र काही गोष्टींवरून एक तर्क बांधता येईल : एक म्हणजे या घटकाच्या वितरणाचा विचार केला तर (ईशान्य प्रदेशामधील) दक्षिणी ओडिया व (वायव्य प्रदेशातील) मराठी यांच्यामध्ये एक मोठी दरी आढळते; दुसरे म्हणजे, कन्नडच्या फक्त उत्तर भागातील बोलीमध्येच हा गुणधर्म आढळतो; तिसरे म्हणजे मराठी व तेलुगू या सलग प्रदेशांत बोलल्या जाणाऱ्या

भाषांच्या सर्व बोलींमध्ये हा गुणधर्म आढळतो. या दोहोंपैकी कोणत्या तरी एका भाषेत हा गुणधर्म उत्पन्न झाला असावा. नक्की कोणत्या भाषेत हा गुणधर्म उत्पन्न झाला असावा हे ठरवायचे तर अधिक ऐतिहासिक संहिताचिकित्सात्मक संशोधनाची आवश्यकता आहे. या संशोधनातून (दोन भाषांतील) सापेक्ष कालक्रम हाती लागू शकेल. काश्मिरीमध्येही याच प्रकारची परिस्थिती आढळते; मात्र तिचे मूळ स्वतंत्रच असावे.

पदिमव्यवस्था व वाक्यरचना यांच्या संबंधात काय घडते याविषयी ब्लोक यांचे सारांशवजा विवेचन (पृ० ३२७-२८) उद्धृत करून नंतर तपशीलासाठी काही बाबींचा विस्तार करणे योग्य ठरेल. पुढील उद्धृतावरून ब्लोक यांचे म्हणणे असे दिसते की, मुंडा व इंडोआर्यन या भाषाकुलांमधील साम्यस्थळांपेक्षा द्रविड व इंडोआर्यन या कुलामध्ये अधिक साम्यस्थळे आहेत. [ब्लोक यांनी द्रविड इंडोआर्यन यांमधील साम्यस्थळे व मुंडा भाषेचे वेगळेपण पुढील उदाहरणांच्या साहाय्याने मांडले आहे.]

*शब्दाच्या पातळीवर द्रविड आणि इंडोआर्यन कुलांतील भाषांमध्ये परप्रत्यय सर्वत्र आढळतात, तर मुंडा भाषेत प्रचलित असणारे पूर्वप्रत्यय व मध्यप्रत्यय या भाषांत आढळत नाहीत (इंडोआर्यनच्या बाबतीत तर मुळात असूनही त्यांचा लोप झाला आहे.) शब्दसमूहाच्या पातळीवर द्रविड आणि इंडोआर्यन कुलातील भाषांमध्ये शब्दयोगी अव्यये आणि क्रियापदांचे पूर्वप्रत्यय यांचा अभाव आढळतो (इंडोआर्यनच्या बाबतीत तर मुळात असूनही त्यांचा लोप झाला आहे) [मुंडा भाषेत हे घटक प्रचलित आहेत.] शब्दरूपांच्या पातळीवर द्रविड आणि इंडोआर्यन कुलातील भाषांमध्ये द्विवचनाचा अभाव दिसतो. (इंडोआर्यनच्या बाबतीत तर मुळात असूनही त्यांचा लोप झाला आहे.) [मुंडा भाषेत द्विवचन प्रचलित आहे]. नामांच्या व सर्वनामांच्या पातळीवर द्रविड आणि इंडोआर्यन कुलातील भाषांमध्ये सरळरूप आणि सामान्यरूप अशी दोन प्रकारची रूपे दिसतात, कर्तृवाचक नामाच्या सामान्यरूपाला षष्ठीचा प्रत्यय लागतो आणि त्याचा मूळ अर्थ लोप पावतो, कर्तृवाचक नामाला प्रथमेचा प्रत्यय तसेच कर्मवाचक नामाला द्वितीया व चतुर्थीचे प्रत्यय लागतात [उलट मुंडा भाषेत दोन रूपांऐवजी एकच रूप आढळते]. क्रियापदाच्या पातळीवर द्रविड आणि इंडोआर्यन कुलातील भाषांमध्ये तृतीय पुरुषामध्ये लिंगानुसार भिन्न रूपे होतात [उलट मुंडा भाषेत एकच रूप आढळते]. द्रविड आणि इंडोआर्यन कुलातील भाषांमध्ये षष्ठीचे अस्तित्व आहे आणि वाक्याच्या जोडणीमध्ये तसेच वाक्प्रचारांमध्ये शैली व व्याकरणाच्या दृष्टीने तिचे महत्त्व आहे. [उलट मुंडा भाषेत असे दिसत नाही.]... द्रविड आणि इंडोआर्यन कुलातील भाषांमध्ये समांतर रचना, तसेच अभ्यस्त व अनुकरणवाचक शब्द मुबलक प्रमाणात आढळतात. उदाहरणार्थ, अशा शब्दांची एक भली मोठी यादी द्रविडी भाषाकुलातील सर्वच भाषांमध्ये करता येईल [उलट मुंडा भाषेत हे आढळत नाही].*[भा४]





अनुक्रमणिका

हे सर्व पुरावे सारख्याच प्रमाणात विश्वासार्ह आहेत असे नव्हे. संस्कृतमधील द्विवचन नाहीसे होणे[भा५] आणि बाकीच्या संपूर्ण इंडा-युरोपीय कुलामधूनच द्विवचन नाहीसे होणे, या प्रक्रिया समांतर आहेत. काही विशिष्ट क्रियापद-प्रवर्गांमध्ये मध्यप्रत्यय[भा६] लागण्याची प्रक्रिया दिसत असे; ती संस्कृतातून नाहीशी होणे व इतरत्रही नाहीशी होणे, या प्रक्रियाही समांतरच आहेत. आधुनिक इंडो-आर्यन भाषांमध्ये क्रियापदांना लागणारे पूर्वप्रत्यय हे पदिमांचा संच म्हणून वापरात राहिले नाहीत, व याचा संबंध (उच्चारणातील) बलाघात प्रारंभिक स्वनावयवांकडे सरकणे, याच्याशी आहे (मग त्यांच्यातील ऐतिहासिक क्रम कसाही असो). (संस्कृतमध्ये) शब्दयोगी अव्यय (प्रेपोझिशन) नसणे हे इंडोयुरोपिअन भाषांचे अभ्यासक तसेच इंडोयुरोपिअनच्या पश्चिमी शाखेचे भाषक या दोघांच्याही दृष्टीने लक्षणीय आहे. मात्र येथे एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे; ती अशी की खुद्द संस्कृतमध्ये शब्दयोगी अव्यय अशी शब्दजाती नाही (व ही शब्दजाती नसणे हा गुणधर्म आदि-इंडोयुरोपिअनमधून लाभलेला वारसा आहे.) येथे उल्लेखिलेल्या पदिमांना 'नामांच्या सान्निध्यात असणारी क्रियाविशेषणे' म्हणायला हवीत व त्यांचे स्थान बहुधा पूर्वप्रत्यय नसून परप्रत्ययाच्या स्वरूपाचे असते. आधुनिक इंडो-आर्यन भाषांमध्ये या पदिमांऐवजी नामरूपे येतात व ही रूपे नेहमीच मुख्य नामाच्या सामान्य रूपानंतरच येतात. संस्कृतमधील रचनांपेक्षा ही रचना फारशी वेगळी नाही. द्रविड भाषांतील समांतर असणाऱ्या रचनांच्या प्रभावामुळे बहुधा हा बदल झाला असावा. व्यक्तिवाचक सर्वनामांच्या ज्या दोन धारा द्रविड भाषांमध्ये आढळतात तशा त्या इंडो-युरोपिअन भाषांमध्येही आढळतात. परंतु प्रत्यय लागण्यापूर्वीचे व्यक्तिवाचक सर्वनामांचे रूप सामान्यपणे दोन प्रकारचे असणे हे इंडो-युरोपिअनचे एक वैशिष्ट्य आहे. (उदा० इंग्लिशमध्ये I व m-{me,my}, संस्कृतमध्ये अहम् व म {माम्, मया, मह्यम्, मत्, मम, मयि, मे}). द्रविड भाषांप्रमाणेच आधुनिक इंडो-आर्यन भाषांमध्येही वेगवेगळ्या अंगांना (stems) तेच विभक्तिप्रत्यय एकवचनात व अनेकवचनात लागतात, ही गोष्ट इतर अभ्यासकांनी दाखवून दिली आहे. (*LSL* : 4.280). ही प्रवृत्ती इंडो-युरोपिअनमध्ये सामान्यपणे आढळणाऱ्या प्रत्ययांच्या प्रवृत्तीपेक्षा वेगळी प्रवृत्ती आहे, हे ब्लूमफिल्ड (*Language* 470) यांचे विवेचन त्यावरच आधारलेले आहे. हे विवेचन पटण्यासारखे आहे आणि द्रविड भाषांतून केलेल्या उसनवारीचा पुरावा म्हणून ते ग्राह्य धरता येईल; मात्र टोखॅरिअन भाषाकुलात[भा७] याच प्रकारच्या रचना आढळतात, हे नमूद करायला हवे.

ब्लोक यांनी क्रियापदाच्या संदर्भात दाखवून दिलेल्या प्रवृत्ती अधिक ठळक आहेत. ते संस्कृतमधील ज्या रूपाला 'जेरोण्डिफ' म्हणतात ते रूप मला विशेष लक्षणीय वाटते; व्हिटनी[भा८] यांची परिभाषा वापरून या रूपाला इंग्लिशमध्ये सामान्यत: 'जेरण्ड'(gerund) म्हणण्यात येते (त्याची इतर नावे absolutive, indeclinable

participle, conjuctive participle, adverbial participle अशी आहेत).[९] भारतातील तिन्ही भाषाकुलांमध्ये क्रियापदाचे अंग किंवा धातुसाधिते (म्हणजेच कालनिर्देश न करणारी क्रियापदाची रूपे) (non-finite verb forms)[भा९] एकापुढे एक मांडून शेवटी कालनिर्देश करणारे (finite) क्रियापदरूप (किंवा विधेयपूरक इतर घटक) जोडून होणाऱ्या रचना आढळतात. द्रविडी भाषांचे हे एक ठळक वैशिष्ट्य आहे; मुंडा भाषांतही ते आहे[१०] व इंडो-आर्यनमध्येही आहे. संस्कृतमधील प्रत्यक्ष (actual) रूपांचा संबंध इंडो-युरोपिअनच्या पदिम-सामग्रीशी जोडता येत असला तरी संस्कृतला इतर इंडो-युरोपिअन भाषांपासून वेगळे काढणारा हा व्याकरणिक गुणधर्म आहे. भारतामध्ये जुनी भाषिक वैशिष्ट्ये पुन्हा वापरात आणण्यासाठी लागणारी प्रेरणा कोठे मिळाली असेल याचा शोध घेण्यासाठी आपल्याला इंडो-युरोपिअन नसणाऱ्या भारतीय भाषांच्या वाक्यरचनेकडे वळावे लागते. वर उल्लेखिलेली रचना आधी द्रविड भाषांमध्ये होती की मुंडा भाषांमध्ये हे शोधण्याचा प्रयत्न करावा लागतो. मात्र मुंडा भाषांविषयी आज आपल्याकडे जेवढे ज्ञान आहे त्याचा विचार करता या तऱ्हेची चर्चा निष्फळच ठरेल. याचे मुख्य कारण असे की, या प्रकारचे क्रियापदांचे अंग वा धातुसाधिते एकापुढे एक ओळीने जोडून होणाऱ्या रचना असणे हा समान गुणधर्म इतर कित्येक भाषांमध्ये व भाषाकुलांमध्ये आढळतो; उदा० विएतनामी, चिनी, जपानी, कोरिअन, ॲल्टेइक, फिनो-युग्रिक (निदान हंगेरिअन)[भा११] यांमध्ये अशा रचना आढळतात. युरेशियाचा विचार करता इंडो-युरोपिअन आणि सेमिटिक भाषाकुले हे दोनच अपवाद या रचनेला आहेत [म्हणजे या दोहोंत या रचना सापडत नाहीत] असे म्हणणे वावगे ठरणार नाही.

मराठी, ओडिया आणि सिंहली या भाषांमध्ये धातुरूपांवर आधारलेल्या आणि नाम म्हणून वा विशेषण म्हणून कार्य करणाऱ्या (किंवा खरे म्हणजे विधेयाच्या अंत्यस्थानी क्रियापद असणाऱ्या) आणि त्यानंतर पर-प्रत्यय येणाऱ्या रचना आढळतात, असेही ब्लोक (p. 328) यांनी नमूद केले आहे. माझ्यापाशी फक्त मराठीमधील पुरावा-सामग्री आहे (तुला : Bloch, *La formation de la langue marathe* 260f., §263), उदा० ''तुझी आई वारल्यापासून.'' [या रचनेमध्ये कर्त्यानंतर (आई) क्रियापदाचे रूप (वारल्या) व त्यानंतर परप्रत्यय (पासून) असा क्रम दिसतो]. बुद्धकालीन मिश्रसंस्कृतमध्ये तसेच पालीमध्ये या प्रकारच्या रचना आढळतात, असे मी *Lg* 30.484 येथे दाखवून दिले आहे. या रचनांत जोड-नामांमधील (compounds) पहिला खंड धातुसाधित रूप असते तर दुसरा खंड हे त्या धातुसाधिताचा (वाक्यरचनात्मकदृष्ट्या) कर्ता नसणारे नाम असते [उदा० 'आगतकाले' (त्याने) आल्यावेळी]. सर्व द्रविडी भाषांत[११] आढळणाऱ्या रचनेला समांतर अशाच या रचना आहेत; सरसकट सगळ्या द्रविडी भाषांतील रचनांमध्ये नाम म्हणून वा विशेषण म्हणून

विधेयाच्या अंत्यस्थानी येणारी धातुरूपे नामापूर्वी येणारी विशेषणात्मक रूपे म्हणूनसुद्धा येतात व त्यांच्यापुढे नाम येते. (उदा० कोटा या भाषेत *आम् उन्चुड उनिप्* 'ज्या विचाराचा' (=उनिप) आम्ही (=आम्) विचार केला आहे. (=उन्चुड). मुंडा भाषेमध्येही ही रचना आढळते, हे काही ब्लोक यांच्या नजरेला आले नाही.[१२] भारत सोडून आशियातील इतर प्रदेशांतील भाषांमध्येही या रचनेला समांतर अशा अनेक रचना आढळतात. मुंडा व द्रविडी यांच्यात ही रचना आधी कोठे निर्माण झाली असावी असा क्रम ठरविता येणार नाही; आपला मुद्दा असा आहे की या रचनेच्या दिशेने जाणाऱ्या इंडो-आर्यनमधील ज्या काहीशा अस्थिर (tentatives) अशा रचना (बहुधा द्रविडी भाषांच्या प्रभावाखाली) आहेत, त्या भारतीयीकरणाच्या प्रक्रियेच्या घोतक आहेत, कारण इंडो-युरोपिअनच्या इतर शाखांमध्ये इतर शाखांमध्ये यांना समांतर रचनाच आढळत नाहीत.

ब्लोक यांनी अभ्यस्त शब्दांच्या रचनेचा उल्लेख केलेला आहे व लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडियाच्या प्रारंभीच्या परिपत्रकांमधून अनेक भारतीय विद्वानांनी त्याचप्रमाणे *New Indian antiquary* 1.109-17 (1938) मध्ये मी स्वतः त्यांच्याविषयी तपशीलवार चर्चा केलेली आहे. या रचनेत सर्वसाधारणपणे व्यं-स्व-क्ष (म्हणजे व्यंजन-स्वर-क्ष) अशा (स्वन-) रचनेचा एक शब्द घेऊन त्याच्यापुढे अभ्यस्त शब्द येतो. हा अभ्यस्त शब्द म्हणजे मूळ व्यं-स्व या स्वनरचनेऐवजी ''गि-'' किंवा ''उ-'' किंवा तत्सम स्वन-रचना असणारा (किंवा ''व्यं'' ऐवजी ''म्'' किंवा तत्सम ध्वनी असणारा) पदिम असतो, आणि क्ष हा (मूळ शब्दातील) क्ष या घटकाचा प्रतिध्वनी असतो (किंवा स्वक्ष हा मूळ शब्दातील स्वक्षचा प्रतिध्वनी असतो.) अभ्यस्त शब्दाचा अर्थ ''आणि तत्सम काही'' असतो. उदा० ''पुलि गिलि'' म्हणजे ''वाघ व तत्सम काही प्राणी'' (मराठी वाघ बिघ). यांत अनेक भेद आढळतात; मात्र जवळजवळ सर्व द्रविड भाषांमध्ये ''गि-'' असणारे अभ्यस्त शब्द आढळतात, हे उल्लेखनीय आहे. सर्वात लक्षणीय मुद्दा म्हणजे तीनही भाषाकुलांध्ये या प्रकारची रचना आढळते. या संदर्भात द्रविड भाषाकुलासंबंधीचा पुरावा सज्जड आहे; इंडो-आर्यन संबंधीचा बऱ्यापैकी आहे, आणि मुंडा भाषाकुलातील निदान सोरा या भाषेसंबंधीही पुरेसा पुरावा आहे.(G.V. Ramamurti, 150ff). सोरा भाषेतील मुख्य अभ्यस्त पदिम 'म्-' हा आहे; हाच पदिम ब्राहुइ, कोलामी, पार्जी, तेलुगु, तमीळ-मल्याळम, या [द्रविडी] भाषा आणि डोगरीसारख्या अनेक इंडो-आर्यन भाषांमध्येही आढळतो. या संदर्भात आणखी पुरावा आणि विश्लेषण यांची गरज आहेच; परंतु अभ्यस्त शब्द हे भारतात सर्वदूर सापडणारे भाषिक वैशिष्ट्य आहे, आणि हे वैशिष्ट्य इंडो-आर्यन कुलाबाहेरून इंडो-आर्यनमध्ये आले असावे (कारण इंडो-युरोपिअनमध्ये ते नाही), ही गोष्ट या वेळपर्यंत स्पष्ट झालेली आहे.

अखेरीस, आतापर्यंत संशोधकांच्या लक्षात न आलेल्या एका बाबीची मी तपशीलवार मांडणी करणार आहे. प्रादेशिक विस्ताराच्या दृष्टीने ही बाब काहीशी मर्यादित आहे; परंतु ती तीनही भाषाकुलांमध्ये आढळते, आणि ती इंडो-युरोपिअनमध्ये सापडत नसली तरी इंडो-आर्यनमधून इतरत्र पसरलेली आहे. ही बाब म्हणजे ''वर्गवाचकां''चा (क्लासिफायर्स) वा ''प्रमाणवाचका''चा (क्वांटिफायर्स) विशिष्ट उपयोग. एखाद्या रचनेत जेव्हा हे घटक वापरले जातात तेव्हा नामाबरोबर संख्यावाचक वा त्या प्रकारचा शब्द येतो आणि शिवाय आणखी एक शब्द वा पदिम येतो (त्यांचा एक छोटासा वर्गच असतो) ज्याला ''वर्गवाचके'' म्हणता येईल किंवा ''प्रमाणवाचके''ही म्हणता येईल. ''वर्गवाचके'' ही संज्ञा असे दर्शविते की वर्गवाचकांनुसारच्या इतकेच नामाचे वर्गीकरण करता येते; ''प्रमाणवाचके'' ही संज्ञा असे दर्शविते की नामांचे गणन होते तेव्हा त्याचे एकक (युनिट) दाखविले जाते. ही एकके अनेक प्रकारची असू शकतात; ती सलग गोष्टींची प्रमाणवाचक एकके असू शकतात (मेझर्ड युनिट्स ऑफ नॉनडिस्क्रीट एन्टिटीज) (उदा० घोटभर पाणी, एकरभर जमीन) किंवा विलग/सुट्या गोष्टींचे विविध निकषांनुसार वर्गीकरण केलेले असते (डिस्क्रीट-एन्टिटीज ॲज क्लास्ड बाय व्हॅरियस क्रायटेरिया) (उदा० मानव विरुद्ध प्राणी, सजीव विरुद्ध निर्जीव, लांब व बारीक विरुद्ध पसरट व बारीक विरुद्ध गोलाकृती) या प्रकारची प्रमाणवाचके बहुधा सर्वच भाषांत वापरली जातात; इंग्लिशमध्ये ए टन ऑफ कोल, टू एकर्ज ऑफ लँड, थ्री हेड ऑफ कॅटल, इ० परंतु आता आपण ज्यांची चर्चा करतो आहोत त्या भाषांमध्ये केवळ सलग गोष्टींचे वा इतर काही गोष्टींचे असे वर्गीकरण वा प्रमाणीकरण केलेले असते असे नव्हे; तर सर्व किंवा जवळजवळ सर्व नामांना हे तत्त्व लागू केलेले असते. या प्रकारची व्यवस्था चिनी, जपानी, कोरिअन, व्हिएतनामी ख्मेर, थाई, बर्मी व मले या भाषांमध्ये ठळकपणे जाणवते.

भारतातील काही भाषांमधील या प्रकारच्या वर्गीकरण-व्यवस्थांची नोंद जवळजवळ घेतली गेलेली नाही, आणि खरे म्हणजे यासंबंधी माहिती मिळणे अवघड आहे. आधुनिक इंडो-आर्यनच्या मागधी भाषांच्या संबंधात त्यांची नोंद झालेली आहे, उदा० बंगाली, आसामी, ओडिया व बिहारीच्या काही बोली (उदा० मैथिली[भा११])[१४]. या एकमेकींशी घनिष्ठ संबंध असणाऱ्या भाषांमध्ये वर्गीकरण-व्यवस्थांचे सुमारे सहा वा त्यापेक्षा अधिक वर्ग केलेले आढळतात. त्यांच्यात पदिमांचा क्रम पुढीलप्रमाणे असतो. नाम+संख्यावाचक+वर्गवाचक, किंवा संख्यावाचक+वर्गवाचक+नाम. या दोन रचनांचे अर्थ वेगळे होतात का याविषयी काहीही माहिती मिळत नाही. एस०के० चॅटर्जी यांच्या मते या सर्व भाषा जवळजवळ सारखेच पदिम वापरतात व त्यामुळे या आधुनिक वर्गीकरण-व्याख्या या मध्य-इंडो-आर्यन कालखंडाच्या अखेरीस जी मागधी अपभ्रंश भाषा होती तिच्यातून उगम पावल्या असाव्यात.

मराठी भाषेमध्ये व्यक्तिवाचक नामांचे गणन होत असताना जेव्हा चारपेक्षा अधिक संख्येचा निर्देश करायचा असतो (किंवा दोन ते चार व्यक्तींच्या संख्येचा निर्देश करायचा असतो) तेव्हा 'जण' (स्त्रीलिंगीरूप 'जणी') असा एकच वर्गवाचक शब्द उपलब्ध आहे; तेव्हा मराठीत या वर्गीकरण व्यवस्थेचे अस्तित्व अगदीच जुजबी आहे, याकडे संशोधकांनी फारसे लक्ष दिलेले नाही.[१५] मागधी भाषेतील एका वर्गवाचक पदिमाशी (बंगाली 'जन') याचे ऐतिहासिक दृष्ट्या नाते आहे; मात्र या रचनेत मराठीमध्ये शब्दक्रम (संख्यावाचक+वर्गवाचक+नाम) असा निश्चित केलेला आहे. उलट मागधी भाषांत या रचनेच्या शब्दक्रमात अनेक भेद आढळतात. मराठीमध्ये एकच वर्गवाचक पदिम असणे व त्याचा आढळ होणाऱ्या रचनांतील पदक्रम सुनिश्चित असणे, या दोहोंवरून असा युक्तिवाद करता येईल की इंडो-आर्यनच्या दोन शाखांमध्ये एकाच घटकाचा विकास निदान मध्य-भारतीय भाषांच्या काळापासून स्वतंत्रपणे झाला असावा; मात्र मागधी भाषांतील पूर्ण विकसित अशा व्यवस्थेमधून प्रेरणा मिळून या रचनेचा उगम मराठीत झाला नसेलच असे मात्र नव्हे. कारण ग्रामीण हिंदीच्या काही बोलींमध्ये मराठीप्रमाणेच 'जना' या शब्दाचा उपयोग होताना आढळतो. हिंदीची व्याकरणे मूलतः फक्त शहरी बोलीतील रूपेच देत असल्यामुळे त्यांच्यामध्ये या रचनेची चर्चा आढळत नाही. नेपाळी भाषेत 'जना' या शब्दाचा या प्रकारचा उपयोग होतो, अशी नोंद नेपाळीच्या शब्दकोशात आढळते.[१६] आधुनिक इंडो-आर्यन भाषा व बोली यांची अधिक पर्याप्त अशी वर्णनात्मक व्याकरणे तयार झाल्याखेरीज भारताच्या या भागातील भाषांमध्ये वर्गवाचकांचा उपयोग आज कसा होतो याची नेमकी कल्पना देता येणे अशक्य आहे. तसेच मध्यकालीन इंडो-आर्यन भाषेच्या विविध टप्प्यांचे अधिक सूक्ष्म संशोधन केल्याखेरीज या शब्दांच्या व्यवस्थेचा इतिहास केवळ तर्कवितर्काच्या स्वरूपाचाच राहील.

द्रविड व मुंडा भाषाकुलांमधील काही भाषांमध्येसुद्धा वर्गवाचक व्यवस्था आढळलेल्या आहेत. उदाहरणार्थ, द्रविड कुलातील कोलामी (वर्धा बोली), पार्जी, कुई-कुवी बोली, कुरुख आणि माल्टो या बोलींमध्ये वर्गवाचक व्यवस्था आहेत, आणि प्रत्येक बाबतीत शेजारच्या इंडो-आर्यन भाषांमधून त्यांची उसनवारीच झालेली दिसते.

कोलामी या भाषेच्या वर्धा बोलीमध्ये सहा व त्याहून व्यक्तींचे गणन करणारे संख्यावाचक असेल तेव्हाच व्यक्तिवाचक नामांबरोबर वर्गवाचक वापरले जाते. ही संख्यावाचके मराठीतून घेतलेली आहेत. त्याचप्रमाणे मराठीतील वर्गवाचक पदिमाची उसनवारी 'जण' आणि 'स्त्रीलिंगी' 'जणीकुल' (मूळ मराठी रूप 'जणी' अधिक कोलामी अनेकवचनी परप्रत्यय '-कुल') अशा स्वरूपात झालेली दिसते. पाच या संख्यावाचकाच्या बाबतीतसुद्धा कोलामीच्या संख्यावाचकाऐवजी विकल्पाने मराठी संख्यावाचक वापरण्याचा पर्याय या बोलीत उपलब्ध आहे. कोलामीची ही वर्धा बोली

प्रामुख्याने मराठी भाषिक प्रदेशात आढळते. (उलट) आदिलाबाद येथील कोलामीच्या बोलीने इतकी संख्यावाचक पदिमे मराठीतून उचललेली नाहीत, तसेच कोलामी संख्यावाचक पदिमांबरोबर मराठी वर्गवाचक पदिमाचा वापरही तिच्यात आढळत नाही. कोलामीच्या या दोन बोलींपुरताच पुरावा उपलब्ध आहे.[१७]

पार्जी या बोलीच्या वर्णनामध्ये या बाबीविषयी काहीच उल्लेख आढळत नाही. मात्र उपलब्ध संहितांवरून असे दिसते की काही उदाहरणात व्यक्तिवाचक नामांबरोबर *जण*चा वापर होतो; शिवाय व्यक्तिवाचक नसणाऱ्या काही नामांबरोबर *गोटा* हे वर्गवाचक पदिम वापरले जाते.[१८] या बोलीच्या नजीकच्या परिसरात हळबी ही इंडो-आर्यन कुलातील भाषा आहे, परंतु तिच्याविषयी फारच कमी माहिती उपलब्ध आहे. इंडो-आर्यनमधील वर्गवाचक पदिम पार्जी बोलीमध्ये गोटा या रूपात दिसतो, आणि तो हळबीमध्येही असावा (*LSI* 7, Standard List item 114 यावरून हा तर्क करता येतो). हा पदिम मराठीतून आलेला नाही हे निश्चित; तो मागधी आहे हेही निश्चित; हिंदीच्या पूर्व प्रदेशातील बोलीपैकी छत्तीसगढी बोलींतही हाच पदिम सापडतो (*LSI* 6.21, 225). पार्जीच्या वर्णनात्मक व्याकरणात असा उल्लेख आहे की सहा व त्याच्यावरील संख्यात्मक पदिमांची उसनवारी हळबी बोलीमधून झालेली आहे. वर्गवाचक पदिम हे मूळ हळबी असणाऱ्या या संख्यावाचकांबरोबरच फक्त वापरले जातात असेही दिसते.

शुल्झ यांनी कुवी बोलीचे जे वर्णन दिले आहे त्यात पार्जीप्रमाणेच (वर्गवाचक पदिमांची) एक व्यवस्था दिसते. यात तीन या संख्येपासून पुढची संख्यावाचके ओडियामधील आहेत आणि 'झाण' (झ=ज) हे वर्गवाचकपदिम पुरुषांचा निर्देश करणाऱ्या नामांबरोबर तर 'गोट्टा' हे वर्गवाचक पदिम इतर सर्व नामांबरोबर वापरले जाते. (कुई-कुवीच्या लिंगव्यवस्थेनुसारच हे आहे).[१९] ओडिया व तेलुगु या भाषांच्या सीमारेषेवरील प्रदेशात ही भाषा बोलली जाते. कुई-कुवीच्या इतर बोली आहेत. एक ओडिया प्रदेशाच्या उत्तरेला आहे. या बोलींच्या वर्णनामध्ये वर्गवाचक पदिमांच्या व्यवस्थेचा काही उल्लेख नाही. मात्र फिट्सजेरल्ड यांनी दिलेल्या कुवीच्या वर्णनामध्ये व्यक्तिवाचक नामांबरोबर वर्गवाचक पदिमाचा वापर एक उदाहरणात सापडतो (*126* : तीनिजोना मास्का 'तीन मुली'). विनफील्ड (*37*) यांनी तीन व त्यावरील संख्यावाचकांची कुई बोलीतील जी रूपे दिली आहेत ती बंगालीतील '-टा' हा उपसर्ग (enclitic) धारण करणाऱ्या संख्यावाचक रूपांसारखीच आहेत. रचनेमधील पदक्रम मागधी भाषेतील पदक्रमासारखाच आहे (नाम+संख्यावाचक+वर्गवाचक). तेव्हा कुई-कुवी बोलींमध्ये ओडियाच्या वर्गवाचक पदिमव्यवस्थेची उसनवारी झालेली आहे, असे म्हणता येण्याइतका पुरावा आपल्यापाशी आहे.

कुरुख भाषेतील वर्गवाचक पदिमांच्या व्यवस्थेचे मागधी भाषांमधील व्यवस्थेशी फार

जवळचे साम्य आहे. पदक्रमांमध्ये पर्याय उपलब्ध असणे तसेच अनेक वर्गवाचक पदिम उपलब्ध असणे ही वैशिष्ट्ये त्यांच्या व्यवस्थांत दिसतात. कुरुख भाषेतील बहुतेक सर्व वर्गवाचक पदिम हे बिहारी व ओडिया या आसपासच्या मागधी भाषांमधून उसनवारी केलेले आहेत. (छत्तीसगडी हिंदी हीसुद्धा शेजारीण आहे; परंतु तिच्यात इतकी विकसित झालेली वर्गवाचक पदिमांची व्यवस्था आढळत नाही.) उदाहरणार्थ, 'झन', 'गोटाङ्', 'ठुर' (तुला: बंगाली -टु'). कुरुखमध्ये चार व त्यापुढील संख्यावाचक पदिम इंडो-आर्यनमधून उसनवारी केलेले आहेत; आणि दोन ते चार हे संख्यावाचक पदिम द्रविड भाषांतून घेतलेले आहेत. कुरुखमधील वर्गवाचक पदिमांचा वापर केवळ इंडो-आर्यनमधून घेतलेल्या संख्यावाचकांबरोबर होतो असे नव्हे; तर द्रविडमधून घेतलेल्या संख्यावाचकांबरोबरही होतो.[२०]

माल्टो या बोलीतील व्यवस्था सर्वाधिक गुंतागुंतीची आहे.[२१] या बोलीत तीन व त्यापुढील संख्यावाचक पदिम हे आसपासच्या बंगाली वा बिहारीमधून उसनवारी केलेले आहेत. या पदिमांबरोबर अनेक वर्गवाचक पदिम वापरले जातात व त्या रचनांमधील पदक्रम (संख्यावाचक+वर्गवाचक+नाम) असा असतो. निदान काही प्रमाणात वर्गवाचक पदिम मागधी भाषांतील व्यवस्थेमधून उसनवारी केलेले आहेत; उदा० 'जेन' आणि 'गोटा' याशिवाय 'डनूरा' हा पदिम लांबट वस्तूंसाठी वापरला जातो. (रस्ते, बांबू, अंगात घालायची वस्त्रे; < आधुनिक इंडो-आर्यन *दंड्- < संस्कृत दंड 'काठी') 'पट' हा पदिम पसरट पृष्ठस्तर असणाऱ्या वस्तूंसाठी वापरला जातो (थाळी, कंगवे, तळे, ढग, पलंगाच्या चौकटी < आधुनिक इंडो-आर्यन *पट्-, *पाट्-; तुला: संस्कृत 'पट्टक'); 'कड' हा पदिम (वेलींच्या)ताणांसारख्या वस्तूंसाठी वापरला जातो (केस, तार, गवत; याची व्युत्पत्ती अजून सापडलेली नाही). आणखी अनेक वर्गवाचक पदिम या भाषेत आहेत, व त्यांची व्युपत्ती अजूनही लागत नाही. शिवाय द्रविड भाषांमधून घेतलेल्या एक व दोन या संख्यावाचकांबरोबर व्यक्तिवाचक नसणारी नामे येतात तेव्हा 'पट', 'कड', 'डनर' इ० वर्गवाचक पदिम वापरले जातात, आणि शिवाय इतरही पदिम असतातच; उदा० 'पानूर' या पदिमाचा उपयोग गोल वस्तूंसाठी होतो (व्युत्पत्ती सापडलेली नाही); 'माक्' हा पदिम प्राण्यांसाठी वापरला जातो (द्रविड भाषांमधून उसनवारी).[२२] या शेवटी उल्लेखिलेल्या रचनेमध्ये अनेक नामांचा उपयोग त्यांचा स्वत:चा वर्गवाचक पदिम म्हणून होतो (उदा० मन्-ओंड मनू 'एक झाड'). एक व दोन या संख्यावाचक पदिमांचा उपयोग करताना या रचनेमधील पदक्रम अगदी अनन्य स्वरूपाचा आहे : (वर्गवाचक+संख्यावाचक+नाम). हा क्रम भारतातल्या इतर कोणत्याही भाषेत नाही व तो बहुधा माल्टोमध्येच उद्भवलेला असावा. -ओना 'एक' आणि -ईस 'दोन' ही या रचनेतील संख्यावाचक रूपे फक्त येथेच सापडतात, इतर कोणत्याही रचनांत ती





अनुक्रमणिका

सापडत नाहीत, हेही उल्लेखनीय आहे (तुलाः **ओर्ट्** 'एक व्यक्ती', **ईव्हर्** 'दोन व्यक्ती'), आणि माल्टोशी जवळून संबंधित असणाऱ्या कुरुखमध्ये **ओर्ट्** 'एक व्यक्ती' आणि **ओण्टा** 'एक प्राणी वा वस्तू' अशी रूपे आहेत; ओण्टा हे रूप नामाआधी वा नामानंतर येऊ शकते (या उलट माल्टोमधील पदक्रम बदलू शकत नाही). तेव्हा माल्टोमध्ये प्रथम संख्यावाचक व वर्गवाचक पदिमांची उसनवारी शेजारच्या मागधी भाषेमधून झाली असावी, आणि नंतर आपल्या पूर्वीच्या वारशाच्या आधारे या भाषेने स्वतंत्रपणे ही व्यवस्था विकसित केली असावी, असे म्हणता येईल.

मुंडा भाषांच्या संबंधीचा पुरावा इतका भक्कम नाही. कोरोवा[२३] या बोलीत झन् आणि ग्वोट्/ग्वोटङ् या इंडोआर्यनमधून उसनवारी केलेल्या रूपांबरोबरच इतर रूपेही वापरली जातात; उदा० **बो** 'गुरांच्या कळपाचा प्रमुख' आणि **होर्** 'व्यक्ती' ही रूपे उसनवारी करून आलेली नाहीत; **होर्** आणि **झन्** यांमध्ये मुक्त वितरण (फ्री व्हेरिएशन) आढळते. या रचनांमध्ये वापरली जाणारी संख्यावाचके उसनवारीची नाहीत. रचनांमधील पदक्रम (संख्यावाचक + वर्गवाचक + नाम) असा आहे. संथाली व मुंडारी या भाषांच्या वर्णनांवरून असे दिसते की या भाषांतही अशाच प्रकारची व्यवस्था आहे. उलट सोरा या भाषेत अशी व्यवस्था अस्तित्वात नाही, हेही स्पष्ट आहे.

तेव्हा, भारतामध्ये, विशेषतः पूर्व व मध्य भारतामध्ये, ही व्यवस्था असणाऱ्या भाषांचा एक विस्तीर्ण प्रदेश आढळतो. यांत बहुतेक ठिकाणी फक्त इंडो-आर्यन वर्गवाचक पदिमाचाच वापर या सर्व भाषांमध्ये झालेला दिसतो, आणि इंडो-आर्यन नसणाऱ्या काही भाषांमध्येसुद्धा हे वर्गवाचक पदिम फक्त इंडो-आर्यनमधून उसनवारी झालेल्या संख्यावाचकांबरोबरच वापरले जातात. यावरून पुनर्रचनात्मक मांडणी करायची झाल्यास मी पुढीलप्रमाणे करीन : भारतापुरते बोलायचे झाल्यास ही रचना मुळात इंडो-आर्यन आहे. इंडो-आर्यनमधून निघालेली (संख्यावाचक + वर्गवाचक) अशी संपूर्ण रचनाच इतर भाषांमध्ये पसरली, आणि यांपैकी काही भाषांनी आपल्या मूळ सामग्रीच्या आधारे, मूळची संख्यावाचके वापरून, तसेच मूळच्या पदिमांचा वापर वर्गवाचक पदिम म्हणून करून, या रचनेचा विकास केला.

तेलुगु आणि कन्नड यांच्या बाबतीत या रचनेसंबंधीची समस्या अधिक अवघड आहे. तेलुगूच्या काही बोलींमध्ये[२४] आठपासून दहापर्यंतच्या संख्यावाचकांनंतर *मंदि* हा वर्गवाचक पदिम व्यक्तींची मोजणी करताना वापरला जातो; उदा० *एनिमिदि मंदि मनुशुलु* 'आठ माणसे'. दहापर्यंत *मंदि* हा पदिम व - *गुरु* हा परप्रत्यय यांत पूरक वितरण (कम्प्लिमेंटरी डिस्ट्रिब्युशन) आढळते (म्हणजेच ही रूपे पदिमांतरे म्हणून वापरतात). -*गुरु* हा परप्रत्यय तीन ते सात या संख्यावाचकांसाठी व्यक्तींच्या संदर्भात वापरला जातो (उदा० *मुग्-गुरु मनुशुलु, नालु-गुरु मनुशुलु*, इ०) आणि -*अरु* हा परप्रत्यय दोन या संख्येसाठी





अनुक्रमणिका

व्यक्तींच्या संदर्भात वापरला जातोः इड्-*अरु मनुशुलु* 'दोन माणसे'. *मंदि* या रूपाचे वर्गीकरण मुक्त पदिम म्हणून करावे की परप्रत्यय (म्हणजे बद्ध पदिम) म्हणून करावे, हे सांगता येणार नाही. तेलुगूचे अधिक विश्लेषण झाल्यानंतर याचे उत्तर कदाचित मिळू शकेल. हा पदिम मुळात द्रविड भाषाकुलातील आहे.[२५] निव्वळ या रचनेपुरताच विचार केला तर ओडियाच्या प्रेरणेमुळे तेलुगुमध्ये ती विकसित झाली असे म्हणता येईल. मात्र बोलींचा नकाशा अधिक पूर्ण स्वरूपात मांडल्याखेरीज आणि कालक्रम निश्चित करणारे पाठसंहितांचे संशोधन अधिक प्रमाणात झाल्याखेरीज याविषयी निश्चित विधान करता येणार नाही. आणखी एक समस्या म्हणजे 'मंदि' या वर्गवाचक पदिमाचा उपयोग आठ या संख्यावाचकापासूनच का सुरू व्हावा, ही आहे. '-अरु' आणि '-गुरु' या परप्रत्ययांबरोबर *'मंदि'*चा वापर पूरक वितरणात होतो, यामध्ये या समस्येचे उत्तर सापडू शकेल. हे दोन परप्रत्यय आठ ते दहा या संख्यावाचकांबरोबर वापरले जात नाहीत, आणि कदाचित *'मंदि'* हे रूप त्याची भरपाई करीत असावे. परंतु हे स्पष्टीकरण अति-हेतुनिष्ठ स्वरूपाचे व कामचलाऊ आहे, त्याचप्रमाणे दहाच्या पुढच्या संख्यावाचकांच्या बाबतीत काहीसे मुक्त वितरण आढळावे हेही थोडेसे अनपेक्षित आहे. तेलुगुमधील ही तथ्ये कन्नडमध्ये आढळणाऱ्या तथ्यांपासून वेगळी काढता येणार नाहीत. कन्नडच्या बाबतीत असे म्हटले जाते[२६] की तिच्या आधुनिक स्वरूपात आणि काही वेळा मध्ययुगीन स्वरूपातही *'मंदि'* हा पदिम संख्यावाचक पदिमांना (कार्डिनल नंबर्स) जोडून जी रूपे तयार होतात ती व्यक्तिवाचक संख्यावाचकांच्या खास रूपांऐवजी वापरली जातात. संख्यांचा क्रम या पदिमाच्या बाबतीत कोठे सुरू होतो हे अनिश्चित आहे; एका संशोधकानुसार तो चारपासून सुरू होतो; दुसऱ्या अधिक चांगल्या संशोधकाने तीनपासून सुरू होणारे उदाहरण दिलेले आहे. मध्ययुगीन कालखंडात (विजयनगरचे साम्राज्य १३३६-१५६५) तेलुगु व कन्नड या भाषांमध्ये एक विशेष राजकीय संबंध होता व त्यामुळे त्यांनी परस्परांकडून मोठ्या प्रमाणावर उसनवारी केलेली आहे. पदटीप क्र. २५मधील व्युत्पत्ती जर अचूक असेल तर या रूपाच्या संबंधातील उसनवारी कन्नड ते तेलुगु अशी झालेली आहे. कन्नडने ही रचना मराठीमधून शब्दशः भाषांतर करून घेतली असावी, हेही शक्य आहे.

तमीळमध्ये, बहुधा बोलभाषेतील वापरात, 'पेर' (नाव) हा वर्गवाचक पदिम दोन व त्यापेक्षा अधिक व्यक्तींच्या निर्देशासाठी वापरला जातो - उदा० 'नालु पेर् तिरुटर्' 'चार चोर'[२७] - हेही येथे नोंदवून ठेवायला हवे.

या तमीळ, कन्नड व तेलुगु उदाहरणांच्या बाबतीत अधिक काही सांगता येणार नाही. परंतु या वर्गवाचक पदिमांचे मूळ आदि-द्रविडमध्ये शोधता येणार नाही, हे अगदी निश्चित.

आपण अगदी सुरुवातीला काही भाषिक गुणधर्मांची चर्चा केलेली आहे; त्यांमध्ये वर्गवाचक पदिमांचा वापर या गुणधर्माची भर घातली की ऐतिहासिक अभ्यासासाठी एक भाषिक क्षेत्र[२८] म्हणून भारताचा विचार करता येतो. जगाच्या पाठीवरचा कोणताही भाग एक भाषिक क्षेत्र म्हणून प्रस्थापित करण्यासाठी जेवढा पुरावा मांडण्यात येतो तेवढा सुस्पष्ट पुरावा आपल्यापाशी निश्चितच आहे. किंबहुना अशा प्रकारचा पुरावा आजवर मांडला गेला आहे त्यापेक्षा अधिक पुरावासामग्री आपल्यापाशी आहे. भाषिक घटक - विशेषत: पदिमव्यवस्था व वाक्यरचना यांच्याशी संबंधित घटक - भाषाकुलांच्या मर्यादा ओलांडून एखाद्या प्रदेशात पसरू शकतात का, या प्रश्नाची चर्चा करताना आपण मांडलेल्या पुराव्याकडे यापुढे दुर्लक्ष होणार नाही, अशी आशा करायला हरकत नाही. (सपीर यांचे मूल्यनिकष वापरायचे ठरवलेच तर) आपल्या पुरावासामग्रीमधील काही घटक माझ्या मते चांगले 'सखोल' पातळीवरचे आहेत. या उसनवारीचा अंतिम परिणाम असा होतो की इंडो-आर्यन व इंडो-युरोपियन भाषाकुलातील इतर भाषा यांच्यात जेवढे साम्य आढळते त्यापेक्षा अधिक साम्य अनेक बाबतीत इंडो-आर्यन व द्रविड कुलोत्पन्न भाषांमध्ये दिसू लागते, हे निश्चित.[२९]

भारताचा अंतर्भाव पूर्व, आग्नेय आणि दक्षिण आशिया या अधिक व्यापक भाषिक क्षेत्रात कसा करता येईल याची रूपरेषा मी इतरत्र दिलेली आहे. आतापर्यंत हाती लागलेला पुरावा वर्गवाचकांच्या वापराविषयीचा आहे, व त्यावरून असा तर्क करता येतो की हा घटक मगध क्षेत्रातील इंडो-आर्यन भाषांपर्यंत आग्नेय आशियातील भाषांमधून आला असणे शक्य आहे. मात्र भारतातील भाषांमधील परस्परसंबंध जेवढ्या स्पष्टपणे दाखवता येतात तेवढ्या स्पष्टपणे वरील संबंध अधिक व्यापक क्षेत्रात दाखविता येत नाहीत आणि प्रस्तुत निबंधात सुस्पष्टपणे मांडलेल्या रूपरेषेला त्यामुळे काही बाधा येत नाही.

**टिपा -**

(१) मी येथे ज्या स्वनात्मक वैशिष्ट्याची तपासणी करणार आहे ते वैशिष्ट्य *लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया* भा१२ (यापुढे एलएसआय असे लघुरूप) 4.278 व पुढे - याचा आधार घेऊन अनेकांनी, उदाहरणार्थ ब्लूमफील्ड 469 व पुढे, उद्धृत केले आहे. ब्लूमफील्ड यांनी आणखी दोन प्रभावांचा उल्लेख केलेला आहे; त्यापैकी पहिला म्हणजे इंडो-युरोपिअनमधील ल् आणि र् या ध्वनींच्या बाबतीत संस्कृतमध्ये गोंधळ होतो; याचे कारण बहुधा असे असावे की संस्कृतच्या अंत:स्तरीय (सबस्ट्राटम) पातळीवर असणाऱ्या एखाद्या अज्ञात भाषेत यांपैकी एकच ध्वनी असावा, असे ब्लूमफील्ड मानतात; परंतु याला काही आधार नाही, कारण भारतामध्ये हे वैशिष्ट्य असणारी एकही भाषा सापडत नाही. ब्लूमफील्ड यांनी उल्लेखिलेल्या दुसऱ्या प्रभावाचा विचार पुढे येईलच; हे प्रभाववैशिष्ट्य म्हणजे

शब्दाची एकवचनी व अनेकवचनी रूपे वेगळी असूनही त्यांना एकच विभक्तिप्रत्यय लागणे, हे होय.

(२) या पुढील विवेचनात 'भारत' व 'भारतीय' या संज्ञा भारतीय उपखंडाचा निर्देश करण्यासाठी वापरलेल्या आहेत. भारत, पाकिस्तान, श्रीलंका, इत्यादी राजकीय विभागणी येथे दुर्लक्षिलेली आहे.

(३) या संदर्भात (भाषेच्या पूर्वरूपाच्या) पुनर्रचनेच्या प्रयत्नासाठी माझा पुढील निबंध पाहा: 'लिंग्विस्टिक प्री-हिस्टरि ऑफ इंडिया', *प्रोसीडिंग्स् अव्ह अमेरिकन फिलॉसॉफिकल सोसायटी* 98.282-92(1954).

(४) हीच वास्तविक स्वरूपाची ऐतिहासिक प्रक्रिया म्हणून आपण स्वीकारायला हवी. सीमाविस्तारामुळे एका संपूर्ण लोकगटाला विस्थापित करून दुसरा गट त्याची जागी येतो, असे मानणे हे अतिसुलभ आणि अवास्तव आहे. सीमाविस्ताराची प्रक्रिया घडत होती यात काही शंका नाही; हल्लेखोर गट आणि धर्मप्रचारक या दोन्ही गटांकडून हा विस्तार होत होता; परंतु आधीच्या लोकगटांना हुसकावून लावण्यामध्ये या दोन्ही गटांना रस नव्हता; आपल्या सत्तेच्या अंकित असणारी प्रजा, तसेच धर्मांतरित झालेले लोक अस्तित्वात असण्यातूनच त्यांना राजकीय, आर्थिक व धार्मिक लाभ होणार होता. ज्या प्रकारचे मूलभूत भाषिक बदल आपण तपासून पाहतो आहोत ते बदल विस्थापनामुळे नव्हे, तर सामावून घेण्याच्या प्रक्रियेमुळे प्रामुख्याने निर्माण झालेले आहेत.

(५) भारतविषयक संशोधनाचा इतिहास व त्यावरील संदर्भासूचीसाठी मी वर टीप क्र० ३मध्ये उल्लेखिलेला माझा निबंध पाहा.

(६) *बीएसएल* 25.1-21 (1925) आणि *बीएसओएस* 5.730-44 (1930) हे ब्लोक यांचे आधीचे निबंध पाहा.

(७) उत्तर मुंडा बोलींमध्ये महाप्राण व्यंजने आहेत व त्यांच्यामुळेच या ना त्या प्रकारे इंडो-युरोपिअनमध्ये ही महाप्राण व्यंजने निर्माण झाली असावीत, असे दाखविण्याचा प्रयत्न ब्लोक (325f) यांनी केलेला आहे. त्यांच्या युक्तिवादात गोंधळ आहे आणि तर्कविकृतीही आहेत; शिवाय, मुंडा भाषाकुलाविषयी आपल्यापाशी इतकी कमी माहिती आहे की या ध्वनींचे त्या बोलीतील स्वरूप व त्यांचा इतिहास यांविषयी ठामपणे काही सांगता येणार नाही. इ० प्रोकोश यांनी *अ कंपरटिव्ह जर्मॅनिक ग्रॅमर* 39 (1939) या ग्रंथात संस्कृतमधील घोष महाप्राण स्फोटक व्यंजनांचे (voiced aspirated stops) मूळ कोठे असावे याविषयी (व नंतर इंडो-युरोपिअनमधील यांच्या स्वनिमात्मक स्वरूपाविषयी) युक्तिवाद करताना निदान

तर्क/

अंशत: एका समजुतीचा आधार घेतला आहे. ही समजूत म्हणजे घोष महाप्राण स्फोटक व्यंजने तिबेटो-बर्मीज, द्रविड व मुंडा भाषाकुलांत सापडतात. तिबेटो-बर्मीजच्या बाबतीत हे म्हणणे योग्य आहे. परंतु मुंडा भाषाकुलाच्या बाबतीत (वर दिलेल्या कारणांमुळे) खूपच अनिश्चितता आहे. द्रविड भाषाकुलाच्या बाबतीत प्रोकोश यांची दिशाभूल ई.एच.टटल् (*मॉडर्न फिलॉलजि* 18.52) यांच्या विवेचनामुळे झालेली आहे. खरे पाहता आधुनिक कन्नड व तेलुगु या भाषांत हे ध्वनी कधी कधी का होईना, पण आढळतात, परंतु टटल् यांनी यावरून हे ध्वनी आदि-द्रविड भाषेत असावेत असे चुकीचे गृहीतकृत्य मांडलेले आहे.

(८) टुबेच्कॉय, (*ॲक्टा लिंग्विस्टिका* 1.84) यांनी इंडो-युरोपिअनच्या सहा वैशिष्ट्यां-पैकी एक पुढीलप्रमाणे मांडले आहे : 'शब्दाच्या आद्यस्थानी धातूच असला पाहिजे असे नाही. कोणतीही इंडो-जर्मन[भा१२] भाषा पूर्वप्रत्ययविरहित नसते. ... अर्वाचीन इंडो-जर्मन भाषांमध्ये पूर्वप्रत्ययांची संख्या बरीच वाढलेली आहे.' टुबेच्कॉय पुढे म्हणतात (पृ० 85) : 'शब्दाच्या वर उल्लेखिलेल्या संरचनात्मक वैशिष्ट्ये नसतील तर त्या भाषेला अस्सल इंडो-जर्मन भाषा मानता येणार नाही.' टुबेच्कॉय यांना आधुनिक इंडो-आर्यन भाषा ठाऊक होत्या का?

(९) पदसिद्धी वा वाक्यसिद्धी यांच्या दृष्टीने या रूपाचा लॅटिनमधील 'जेरंड'शी किंवा 'जेरंडिव'शी किंवा 'पार्टिसिपल' रूपांशी काहीही संबंध नाही. या रूपासाठी समाधानकारक अशी संज्ञा अजून तरी मिळालेली नाही. रशियन भाषेत याच प्रकारचे वाक्यरचनात्मक गुणधर्म असणाऱ्या रूपांसाठी 'पास्ट जेरंड' अशी संज्ञा वापरली जाते. स्लाविक भाषातज्ज्ञांनीही या संज्ञेविषयी असमाधान व्यक्त केलेले आहे. रशियन व इतर स्लाविक भाषांमध्ये ही रूपे नव्याने आलेली आहेत, ओल्ड चर्च स्लाविकमध्ये ती सापडत नाहीत. भारतीय भाषांतील रूपांशी या स्लाविक भाषांतील रूपांचा काही संबंध नाही.

(१०) ब्लोक 327. यांच्याविषयी पूर्ण आदर बाळगून मी हे विधान करतो आहे. पाहा : पी०ओ० बॉडिंग *मटीरिअल्स् फॉर अ संथाली ग्रॅमर* II *मोस्टली मॉर्‌फॉलॉजिकल* 273 व पुढे (1929); हॉफमन *मुंडारी ग्रॅमर* 189. व पुढे (1903); जी०व्ही० राममूर्ती *अ मॅन्युअल ऑफ द सोरा (ऑर सवारा) लँग्विज्* 28 §59, 29 §§71-2, 44 §143 §145.

(११) ब्लोक *Structure grammaticale des langues dravidiennes* 64-6; एमनो, *लँग्विज* 24.321, पहिला परिच्छेद

(१२) पी०ओ० बॉडिंग 50-1; जे० हॉफमान lv-lvi 120-1; जी०व्ही० राममूर्ती 49 §168, §§170-3.

(१३) Circular 3, 14 May 1928, 7-8; Circular 4, 25 June 1928, 2, 8-10, 13-14, 16.

(१४) या संदर्भात सर्वोकृष्ट सोदाहरण विवेचन सुनीती कुमार चॅटर्जी यांनी केलेले आहे; पाहा : *दि ऑरिजिन अँड डिव्हेलपमेंट ऑफ द बंगाली लँग्विज्* 777-81 ('enclitic definitives or enumeratives') बनिकांत काकती यांचा ग्रंथ, *ॲसमीज्, इट्स फॉर्मेशन अँड डिव्हेलपमेंट* 265-9 (1941); -(सर) जॉर्ज एब्रहॅम ग्रिअरसन यांचा *सेव्हन ग्रमर्झ ऑफ द डायलिक्टस् अँड सब-डायलिक्टस ऑफ द बिहारी लॅंग्विज*. ही बाब ब्लोक यांनी लक्षात घेतलेली होती : *L indo-aryen du Veda aux temps modernes* 189 (1934); त्यांनी अंत:स्तरीय प्रभाव येथे महत्त्वाचा मानला आहे व सियामीज भाषेचा उल्लेख केला आहे.

(१५) या बाबीचा शोध मराठीच्या व्याकरणांवरून घेता येणे अवघड आहे.
एच०एम० लँबर्ट यांच्या *मराठी लँग्विज कोर्स* 243 (1943) या ग्रंथात याचे त्रोटक विवेचन आले आहे. त्याहीपेक्षा अधिक त्रोटक विवेचन एस०एम० कत्रे यांच्या *द फॉर्मेशन ऑफ कोंकणी* (1942) या ग्रंथात (117 §236) आढळते. *La formation de la langue marathe* या आपल्या ग्रंथात ब्लोक यांनी ही रचना लक्षात घेतलेली नाही. L'indo-aryen 189 या ठिकाणी मागधी भाषेच्या वैशिष्ट्यांची चर्चा करताना ते म्हणतात की, ही पूर्वेकडील, म्हणजेच मागधी भाषांच्या गटापुरतीच मर्यादित आहे.

(१६) माझे विद्यार्थी फिलिप बार्कर यांनी अगदी वेगवेगळ्या ठिकाणच्या अनेक ग्रामीण हिंदी भाषक समाजांमध्ये संशोधन केलेले आहे. त्यांच्याशी झालेल्या संभाषणावर हे विधान आधारित आहे. एलएसआयमध्ये याची काही तुरळक उदाहरणे आढळत असली तरी ती नोंद घेण्याजोगी नाहीत. परंतु छत्तीसगढ हिंदी, तसेच हळबी व रांची जिल्ह्यात बोलली जाणारी बिहारी या बोलीच्या बाबतीतही ज - ऐवजी झ - वापरून झन अशी नोंद एलएसआयमध्ये केलेली आहे, हे लक्षात घेणे आवश्यक आहे. (LSI 5.2.284) नेपाळीसाठी टर्नर यांच्या शब्दकोशातील ''जना'' ही नोंद पाहा.

(१७) वर्धा बोलीसाठी पाहा : एम्०बी० एमिनो, *Kolami, a Dravidian language* § 4.63, § 8.55 (University of California Publications in Linguistics, Vol. 12; 1955); या आधी उल्लेखिलेल्या बोलीविषयीचे विवेचन माझ्या माहितीनुसार पुढील छेदकांमध्ये मिळेल - §9.21-3. आदिलाबाद

बोलीविषयीचे विवेचन पी० सेतुमाधव राव *A grammar of the Kolami language* (1950) येथे आहे.

(१८) टी० बरो आणि एस० भट्टाचार्य, *The Parji language* (1953). जण साठी संदर्भ पृ० ७१ वाक्य १५, पृ० १०४ वाक्य १ व ४, पृ० १०७ वाक्य २४, पृ० १२० वाक्य १ (2exx); *गोटा* साठी पृ० १०८ वाक्य ३०, पृ० १३३ वाक्य ८९.

(१९) एफ०व्ही०पी० शुल्त्स, *A grammar of the Kuvi language* 100 व पुढे (1911) ए०जी० फिट्ज्जेरल्ड, *Kuvinga bassa : The Khond language as spoken by the Parjas... of the Madras Presidency* (1913); W.W. Winfield, *A grammar of the Kui language* (1928).

(२०) ए० ग्रिग्नर्ड, *A grammar of Oraon language* 29 व पुढे (1924)

(२१) अर्नेस्ट ड्रयोझ, *Introduction to the Malto language* 15-26 (1884).

(२२) व्युत्पत्ती देताना या पददीपेत तसेच पदटीप २५मध्ये भाषांसाठी वापरलेली आद्याक्षरे ही *Lg* 29.339 footnote 1 या ठिकाणी तसेच *Kolami, a Dravidian language* या ग्रंथात दिल्याप्रमाणे आहेत. Ta. (तमीळ) *मक, मकवु* (मूल, प्राण्याचे पिल्लू), *मकण* (पुत्र, पुरुष, पती); *मकळ* (कन्या, स्त्री, पत्नी); *मक्कळ* (बालके, माणसे); *मोणई* (बाळ, बालकाला प्रेमाने हाक मारण्याचे संबोधन). Ma. [मळ्याळम्] *मकन,* (लोकभाषेत) मॉन (पुत्र); *मकळ* (कन्या); *मक्कळ* (बालके, प्राण्यांची पिल्ले). Ko.(कोलामी) *मोग्* (सामान्य रूप मोग्-, मो.त्- (बालक, पत्नी); पे-मोग् (स्त्री), पेण् (मादी); मो.ळ् (कन्या).. To. (तोडा) *मोख* (सामान्य रूप मो.त्-) (बालक, पुत्र, नर, कन्या, स्त्री); *तोझ मोख* (तोडा स्त्री किंवा पत्नी). Ka. (कन्नड) *मग* (पुत्र, नर); *मगळ* (कन्या); *मक्कळ* (बालके); *मगवु, मोग, मोगु, मोगुवु* (तान्हे बालक). - Kod. [कोडुगु] मो.व (पुत्र); मो.व (कन्या); *मक्क* (बालके); *पोम मक्क* (स्त्रिया, पत्नी अनेकवचन) *पोण्णी* (पत्नी, मादी); *मोनु* (पुत्र); *मगळु, मोनी* (कन्या); *मक्कळाटिगे* (बालिशपण). Te. [तेलुगु] *मग*, बोलभाषेत *मोग* (नर); *मगाडु* (पुत्र, नवरा, पुरुष, श्रेष्ठ पुरुष); *मगदी* (कोणताही प्राणी, पशू वा पक्षी यांमधील नर); *मगनालु* (पत्नी); Malt. [माल्टो] *मके* (मुलगा); *मकी* (मुलगी); *मको* (लहान, छोटा, वयाने लहान); *मकु* (प्राण्याचे पिल्लू); *मकमको*

(छोटी मंडळी) (क=ख). Kol. [कोलामी] *मगवन्* (नवरा) (यावरून कोलामी ही द्रविडिअन भाषा आहे हे सिद्ध होते.)

(२३) फिलिप बार्कर यांच्याकडून मिळालेली माहिती. झ-ने सुरू होणारे रूप हे लक्षणीय आहे. हेच रूप कुरुख भाषेत त्याचप्रमाणे आसपासच्या हिंदीच्या बोलीमध्येही आढळते.

(२४) बी०एच० कृष्णमूर्ती यांच्याकडून मिळालेली माहिती.

(२५) ए०एच० आर्डन यांच्या *A progressive grammar of the Telugu language* 88 §236 (4th ed., 1937) या ग्रंथावरून ही गोष्ट अजिबात स्पष्ट होत नाही. *मंडी* या शब्दाची व्युत्पत्ती : तमीळ *मण्रू* सभागृह, न्यायालय, गोठा, गायींचा कळप, गावांतील सभांसाठी झाडाखाली उभारलेला मंच, चौरस्ता; *मणरम्* सभागृह, न्यायालय, झाडाखाली तयार केलेली सभेची जागा, मोकळे आवार, गोठा, लांबलचक रस्ता; *मंतई* (जुन्या वाङ्मयात सापडत नाही) पक्ष्यांचा थवा, कळप, सामायिक कुरण, गावाच्या मध्यभागी असणारे मोकळे आवार. मल्याळम् *मण्णम्, मण्णू* न्यायदानाची वा चर्चेची जागा; कोटा *मंड्*, तोडा *मुंद्* स्मशानभूमी, *मंद्म्* सभा. तोडा मोड् आदिवासींच्या कार्यक्रमांचे केंद्रस्थान, दुग्धालय, दुग्धालय असणारे गाव, स्मशानभूमी, पितृसत्ताक वंश. कन्नड *मंदे, मंदि* शेळ्या-बकऱ्यांचा कळप, गुरांचा वा म्हशींचा कळप, जंगलात वा गावाजवळ असणारी कळपांसाठीची मोकळी जागा, कोंडवाडा, मेंढवाडा, लोक. *कोडुगु मंदि* गावातली हिरवळीची जागा. तुळू *मंदि, मंदे* लोक. तेलुगु *मंदा* थवा, कळप, तांडा, (बडागा भाषेमध्येसुद्धा पुढील अर्थ) गावाबाहेर असणारा कोंडवाडा, धनगरांची वाडी; *मंडी* संख्यावाचक, घोळका, वा माणसांचा जमाव; लवाजमा, पायदळ. कोलामी (एस् आर्) *मंदी* माणसे, (किन्) *मंडी* माणूस. या सर्व शब्दांचा एकत्रितपणे विचार करायचा झाला तर तेलुगु रूपांच्या बाबतीत काही स्वनिमव्यवस्थात्मक स्पष्टीकरण देणे आवश्यक आहे. स्वनात्मक संबंध दाखवताना पुढील मांडणी योग्य होईल. आदि-द्रविड रूप * ण्र् → तमीळ ण्र्, मल्याळम *ण्ण्*, कोटा ड् (या व्युत्पत्तीमधील प्रत्यक्ष रूपांची चर्चा येथे केलेली नाही), तोडा ड्, कन्नड, *कोडूगू नृद्*, *तुळू नृड्* (आणि इतर विकसित रूपे), *तेलुगू नृड्*, कोलामी *नृद्*, पार्जी *नृद्*, (ईशान्य बोलीमध्ये) *नृड्*, ओल्लरी *नृड्*, (अधिक माहितीकरिता पाहा : एमेनो यांच्या *Kolami, a Dravidian language* या ग्रंथातील §10.25). याचे एक साधे उदाहरण म्हणजे वेलेरिक मायरोवलन [भारतीय परिभाषेत बेहडा] (टर्मिनालिया बेलेरिका रोक्स. ही वनस्पतिविज्ञानातील प्रजाती) याच्याकरिता तेलुगुमधील रूप : तमीळ *ताण्री*, मल्याळम *ताण्णी*,

कन्नड *तारी* (अनुनासिकरहित रूप), तुळू *दाण्डि*, तेलुगु *ताऽडी*, *ताणूड्रा*, पार्जी *देऽनूदी*... परंतु या विधानाला काही लक्षणीय अपवाद आहेत. आता ज्या शब्दाची चर्चा चालू आहे तो शब्द यातच मोडतो, शिवाय आणखी दोन उदाहरणे पुढीलप्रमाणे :

( १ ) 'डुक्कर' या अर्थाचे शब्द तमिळ *पणूरी*, मल्याळम *पणूणी*, कोटा पज् (**-णूरी → ज्*), तोडा *पोद्य्* (बहुधा बडगा या कन्नडच्या बोलीतून उसनवारी), कन्नड, कोडुगू *पंदी*, तुळू *पंजी*, तेलुगु *पंदी*, गोंडी *पद्दी*, पार्जी *पेनूद्*, (ईशान्य बोली) *पेणूड्*, कुई *पज्जी*.

( २ ) तमीळ *कणूरु*, विविध प्राण्यांचे पिल्ले (वासरू, शिंगरू, इ०) रोपटे मल्याळम *कणूणु* (सामान्यरूप *कर्रु*) गायीगुरांचे वासरू (विशेषतः म्हशीचे रेडकू), केळीच्या मुख्य झाडाभोवती असणारी केळीची लहान रोपटी, *कर्रा* मुलगा, वासरू. तोडा *कोर्* एक वर्षाखालील मादी रेडकू. कन्नड *करु*, *कर*, *करुवू* वासरू, *कंद* बालक, *कंदु* वासरू, केळीच्या मुख्य झाडाभोवती असणारी केळीची लहान रोपटी. तुळू *कंजी* वासरू, तेलुगु *कंदु कंदुवु* तान्हे मूल. पार्जी *कर्* रोपटे. कुरुख *खद्द्* मूल, प्राण्यांचे पिल्लू, किंवा रोपटे. णाल्टो *कदे* पुत्र. तेलुगुमधील अनियमित रूपांकरिता संदर्भाश्रित स्पष्टीकरण देता येणे शक्य दिसत नाही. या सर्व उदाहरणांमध्ये कन्नडचा प्रभाव आहे आणि शेवटच्या दोन उदाहरणांमध्ये तमीळचा प्रभाव आहे, असे म्हणता येईल.

(२६) एफ० किटल, *A grammar of the Kannada Language* 258 (1903); हॅरल्ड स्पेन्सर *A Kanarese grammar 94 (1914).*

(२७) ए०एच० आर्डन, *A progressive grammar of common Tamil* 118 (4th ed. 1934); जॅरल्ड स्पेन्सर जूलियन व्हिन्सन *Manuel de la langue tamoule* 102 (1903).

(२८) एखाद्या भौगोलिक क्षेत्रात एकाहून अधिक भाषाकुलांतील भाषा असतील आणि त्यांमध्ये काही समान घटक आढळत असतील; परंतु ते घटक त्यापैकी निदान एका भाषाकुलातील भाषांमध्ये आढळत नसतील असे क्षेत्र म्हणजे 'भाषिक क्षेत्र' होय, अशी व्याख्या देता येते, पारिभाषिक संज्ञा वापरायची झाल्यास ही व्याख्या पुरेशी समाधानकारक नसेलही. मात्र टुबेच्कॉय यांनी *Pacific Northwest quarterly* 34.271-92 (1943) या नियतकालिकामधील निबंधामध्ये 'Sprachbund' ही संज्ञा वापरलेली आहे. या संज्ञेचे भाषांतर करताना

एच्०व्ही० व्हेल्टन यांनी 'Linguistic Area' ही संज्ञा वर दिलेल्या व्याख्येनुसार आधीच वापरली आहे, ही जमेची बाजू म्हणता येईल. (सीबॉक, *IJAL* 10.214 [1944] आणि वोगेलिन, *Word* [1945] या निबंधांवरून ही गोष्ट माझ्या लक्षात आली.) ही संज्ञा वापरताना तोटा असा की त्यापासून विशेषण सिद्ध होत नाही. तसेच 'Areal Linguistics' अशी संज्ञाही वापरता येणार नाही; कारण इटालियन नीओ-लिंग्विस्टिक विचारप्रणालीच्या संशोधकांनी ही संज्ञा एका वेगळ्या अर्थाने आधीच वापरून टाकली आहे. एखादा अधिक तल्लख बुद्धीचा संशोधक याहून अधिक चांगली संज्ञा शोधून काढीत नाही तोपर्यंत याच संज्ञेने काम भागेल.

(२९) मात्र ब्लोक (330) यांनी अखेरीस केलेले विधान व त्यापुष्ट्यर्थ दिलेली कारणे यांच्याकडे आपल्याला दुर्लक्ष करून चालणार नाही : ''तेव्हा अशा तऱ्हेने जरी स्थानिक प्रभाव खोलवर परिणाम करणारा असला तरी त्यामुळे इंडो-युरोपिअन भाषांपासून इंडो-आर्यन भाषा फार वेगळ्या झाल्या नाहीत.'''

**भाषांतरकारांच्या टिपा**

भा[१] फ्रान्त्स बौझ (१८५८ - १९४२) जर्मन-अमेरिकन मानववंशवैज्ञानिक व भाषा-वैज्ञानिक. अमेरिकन मानववंशविज्ञान आणि भाषाविज्ञान या क्षेत्रातील अमेरिकन परंपरेचा जनक असे त्यांचे वर्णन करता येईल. *The Mind of Primitive Man* (1911) आणि *Handbook of American Indian languages* (1911) या त्यांच्या दोन ग्रंथांनी अमेरिकेतील मूलनिवासी जमातींच्या संस्कृतीच्या आणि भाषांच्या वर्णनात्मक अभ्यासाची पायाभरणी कोलंबिया विद्यापीठामध्ये केली. अनुभववादी आणि ऐतिहासिक पद्धतींचा वापर मानववंशवैज्ञानिक संशोधनात करून संस्कृतीचे स्वरूप प्रवाही व चल असते अशी संकल्पना त्यांनी विकसित केली. एडवर्ड सपीर (१८८४-१९३९) आणि आल्फ्रेड एल्० क्र्योबर (१८७६-१९६०) हे दोघेही बौझ यांचे विद्यार्थी होते आणि त्यांनी वरील शाखांच्या संशोधनाच्या परंपरेमध्ये महत्त्वाची भर घातली. सपीर हे मानववंशवैज्ञानिक आणि भाषावैज्ञानिक होते. अमेरिकन संरचनावादी भाषाविज्ञानाचे ते प्रणेते होते. नूटका, नवहो यांसारख्या अमेरिका मूलनिवासी समाजांच्या भाषांवरील त्यांचे संशोधन महत्त्वाचे आहे. *Language: An introduction to the study of speech* (1921) हा त्यांचा ग्रंथ आधुनिक भाषाविज्ञानातील एक पायाभूत ग्रंथ मानला जातो. भाषा आणि संस्कृती यांच्या परस्परसंबंधांविषयीचा त्यांचा विचार 'सपीर-वोर्फ अभ्युपगम' या नावाने

ओळखला जातो. आंतरराष्ट्रीय संपर्क-भाषा या विषयावरील त्यांचे कार्यही उल्लेखनीय आहे. आल्फ्रेड एल्० क्र्योबर हे प्रामुख्याने मानववंशवैज्ञानिक होते. सांस्कृतिक क्षेत्र, सांस्कृतिक आकृतिबंध आणि सांस्कृतिक थकवा या तीन मूलभूत संकल्पना आपल्या लेखनामध्ये त्यांनी विकसित केल्या. *Handbook of the Indians of California* (1925) आणि *The Nature of Culture* (1952) हे दोन महत्त्वाचे ग्रंथ त्यांनी लिहिले.

भा[२] ज्यूल ब्लोक (१८८०-१९५३) या फ्रेंच भाषावैज्ञानिकाने भारतीय भाषांवर, विशेषत: मराठी भाषेवर ऐतिहासिक पद्धतीने संशोधन करून *La formation de la langue marathe* (१९२०) हा ग्रंथ लिहिला. मराठी भाषेचा विकास (पुणे : वा०गो० परांजपे, १९४१) हे त्या ग्रंथाचे मराठी भाषांतर वा०गो० परांजपे यांनी केलेले आहे. *The Formation of Marathi Language* (Delhi: Motilal Banarasidass, 1970) हे देव राज चनाना यांचे इंग्लिश भाषांतरही उपलब्ध आहे.

भा[३] पश्च स्वरांपूर्वी होणारे च् आणि ज् हे उच्चार मराठीमध्ये दंतमूलीय आहेत, परंतु देवनागरी लिपीमध्ये दंतमूलीय व तालव्य यांच्या चिन्हांत भेद दर्शविण्यासाठी सोय नाही. या भाषांतरात हा भेद महत्त्वाचा असल्याने दंतमूलीय उच्चारांसाठी व्यंजनचिन्हाखाली नुक्ता दिलेला आहे. एमिनो यांनी वापरलेली चिन्हे जुनी आहेत. आंतरराष्ट्रीय स्वनलिपीच्या २००५च्या यादीनुसार (आय/पी/ए/ २००५मध्ये) दंतमूलीय उच्चारांसाठी /t̪s/आणि/d̪ʒ/ अशी चिन्हे देता येतात. त्याचप्रमाणे तालव्य उच्चारांसाठी /tʃ/ आणि/dʒ/ अशी चिन्हे देता येतात.

भा[४] मुळातील फ्रेंच उद्धृताचे भाषांतर करीत असताना डॉ० उज्ज्वला जोगळेकर (पुणे विद्यापीठ) यांची मदत झाली.

भा[५] संस्कृतमधील द्विवचन कोणत्याही टप्प्यावर नाहीसे झालेले नाही. त्यामुळे एमिनो यांनी हे विधान का केले आहे याचा उलगडा होत नाही. कदाचित संस्कृतमधील द्विवचन अर्वाचीन इंडोआर्यन भाषांमध्ये नाहीसे होणे असे त्यांना अभिप्रेत असावे.

भा[६] मध्यप्रत्यय म्हणजे शब्दाच्या मध्ये लागणारा प्रत्यय. याउलट पूर्वप्रत्यय आणि परप्रत्यय हे अनुक्रमे शब्दाच्या आधी आणि नंतर लागणारे प्रत्यय असतात. फिलीपीन्स द्वीपसमूहात बोलल्या जाणाऱ्या टगालॉग या एका प्रमुख भाषेतील पुढील उदाहरणाचा उल्लेख करता येईल : सुलात (लिहिणे) या क्रियापदाचे पॅसिव्ह रूप इन् हा मध्यप्रत्यय लागून स-इन्-उलात किंवा सिनुलात (लिहिले जाणे) असे होते.

भा[७] टोखॅरिअन भाषाकुल हे इंडो-युरोपिअन भाषाकुलातील एक उपकुल होते. इ०स० तिसरे ते नववे शतक या काळात या उपकुलातील भाषा मध्य आशियात प्रचलित होत्या. आज या भाषा नष्ट झालेल्या आहेत.

भा[८] विल्यम ड्वाइट विटनी (१८२७ - ९४) हा अमेरिकन भाषावैज्ञानिक इंडो-युरोपिअन आणि संस्कृत यांचा तज्ज्ञ होता. तो अमेरिकन फिललॉजिकल असोसिएशनचा संस्थापक होता आणि ऐतिहासिक भाषाविज्ञान आणि कोशवाङ्मय या क्षेत्रातील त्याची कामगिरी महत्त्वाची आहे.

भा[९] क्रियापद ही संज्ञा मराठीमध्ये काहीशी ढिलेपणाने वापरली जाते. धातूंना प्रत्यय लागून होणारी रूपे कालनिर्देश करणारी आणि न करणारी अशी दोन्ही प्रकारची असतात. उदा० 'कर्' हा धातू; केला, करेल, करतो, इ० रूपे कालनिर्देश करतात. त्यांना क्रियापद म्हणणे योग्य ठरेल तर करणे, करून, इ० रूपे कालनिर्देश करीत नाहीत, त्यांना धातुसाधिते म्हणावे.

भा[१०] फिनो-युग्रिक हा युरॅलिक भाषाकुलातील एक भाषा-समूह आहे. या भाषा पूर्व आणि उत्तर युरोपमध्ये तसेच उत्तर आशियामध्ये बोलल्या जातात.

भा[११] २००३मध्ये झालेल्या घटनादुरुस्तीनुसार मैथिलीला स्वतंत्र भाषा हे स्थान मिळाले आहे.

भा[१२] जॉर्ज ग्रिअरसन हे ब्रिटिश राजवटीत भारतीय प्रशासकीय सेवेमध्ये अधिकारी होते. त्यांच्या मार्गदर्शनाखाली १८९४ ते १९२८ या कालखंडात भारतातील ३६४ भाषा आणि बोलींचे सर्वंकष असे सर्वेक्षण करण्यात आले आणि ते *लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया* या शीर्षकाखाली प्रकाशित झाले.

भा[१३] इंडो-युरोपिअन भाषाकुलाला जर्मन भाषावैज्ञानिक इंडो-जर्मन भाषाकुल असे नाव देतात. ■

**अर्जुनरूपी जनता**

विविध माध्यमांमधून वेगवेगळ्या विशेषज्ञांकडून आपल्याला तऱ्हतऱ्हेची माहिती उपलब्ध होते. परंतु बुद्धी व मन नि:शंक होण्याऐवजी रोजच्या रोज संशय वाढतच जातो. हे फक्त जैतापूरबद्दल सत्य नाही. कोणत्याही प्रश्नाची उलटसुलट बाजू सतत समोर येत असते. सत्य ते काय याचा निर्वाळा कधीच होत नाही आणि अशा अनिश्चित अवस्थेमध्ये माणूस अधिकच भांबावून जातो. काही वेळा वाटतं, कृष्णच खूप झाले आहेत की काय? परंतु त्यामुळे अर्जुनरूपी जनतेचा संदेह मात्र वाढत राहतो.

- दिनकर गांगल, अध्यक्ष, कोकण मराठी साहित्यसंमेलन, रोहा.



अनुक्रमणिका

# अद्ययावत मराठी शब्दकोशाची निकड

अनघा भट-बेहेरे

: १ :

जून २००२ ते मे २००५ या कालावधीत विद्यापीठ अनुदान आयोगाच्या एका प्रकल्पाद्वारे (बहुधा) पहिल्याच रशियन-मराठी शब्दकोशाचे काम करण्यात आले. २००६ सालाच्या मध्यावर हा शब्दकोश प्रकाशित झाला. त्या अनुभवाने थोडा हुरूप येऊन मराठी-रशियन-जर्मन अशा त्रैभाषिक कोशाची आखणी करण्यात आली. पुन्हा विद्यापीठ अनुदान आयोगाच्याच प्रकल्पांतर्गत २००७ ते २०१० या कालावधीत हे काम हाती घेण्यात आले. मराठी-रशियन-जर्मन शब्दकोशाचे काम सध्या अखेरच्या टप्प्यात आले असून शब्दकोश लवकरच प्रकाशित होईल.

वर उल्लेख केलेल्या शब्दकोश प्रकल्पांकरिता मराठीतील काही शब्दकोशांची मदत घेण्यात आली. ते असे :

(१) मोल्सवर्थ : मराठी-इंग्रजी शब्दकोश (सुधारित पुनर्मुद्रण) - शुभदा सारस्वत प्रकाशन, पुणे.

(२) द न्यू स्टँडर्ड मराठी-इंग्लिश-मराठी डिक्शनरी - म०श्री० सरमोकदम, केशव भिकाजी ढवळे, गिरगाव, मुंबई, २००२.

(३) आदर्श मराठी शब्दकोश - प्र०न० जोशी, विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, पुणे, १९८२.

(४) नवनीत मराठी-इंग्लिश डिक्शनरी - सु०र० प्रभुदेसाई, नवनीत प्रकाशन, दादर, मुंबई २०१०.

(५) शब्दानंद - ट्रायलिंग्वल क्लासिफाइड डिक्शनरी - सत्त्वशीला सामंत, डायमंड पब्लिकेशन, पुणे ४११००७.

(६) अभिनव मराठी-मराठी-इंग्रजी पर्याय शब्दकोश - वि०शं० ठकार, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, २००२.

(७) मराठी भाषेचे वाक्प्रचार व म्हणी - कै० वा०वि० भिडे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, २००६.

(८) मराठी शब्दलेखन कोश - यास्मिन शेख, मनोविकास प्रकाशन, पुणे, २००७.





अनुक्रमणिका

मराठी-रशियन-जर्मन शब्दकोशासाठी मूल मराठी शब्द (लेक्सिकल एंट्री) निवडणे, विविध अर्थच्छटांनुसार त्यांची वर्गवारी करणे, ती अर्थच्छटा नेमकेपणाने व्यक्त करणारी साहित्यातील अथवा दैनंदिन भाषाव्यवहारातील उदाहरणे निवडणे हे काम करत असताना सध्या उपलब्ध असलेल्या मराठी शब्दकोशांतील त्रुटी जाणवत राहिल्या. त्या त्रुटींचा थोडक्यात विमर्श प्रस्तुत लेखात घेतला आहे.

: २ :

कोणत्याही भाषेत उपलब्ध असणारे कोशवाङ्मय ही त्या भाषेची श्रीमंती असते. इतकेच नव्हे, तर ज्ञानभाषा म्हणून असणारे भाषेचे महत्त्वसुद्धा त्यामुळे अधोरेखित होते. शब्दकोश हे तर भाषेच्या विकासाचे निर्देशकच म्हटले पाहिजेत. शब्दकोशांची निर्मिती, जुन्या शब्दकोशांचे परीक्षण व व संपादन, संस्करण, नव्या शब्दांची शब्दकोशात भर व वापरातून गेलेल्या शब्दांचे शब्दकोशातून निष्कासन ही सतत चालणारी प्रक्रिया असते. युरोपीय भाषांतून विशेषतः इंग्रजीमध्ये अशा तऱ्हेने चालणारे कोशनिर्मितीचे काम आपल्या सर्वांच्या चांगले परिचयाचे आहे.

भाषा प्रवाही असते. दर पिढीगणिक आणि दर दहा कोसावर भाषा बदलते हे जरी खरे असले तरीही ह्या बदलत्या स्वरूपाची नोंद घेत भाषेचे प्रमाणीकरण करण्याचे काम शब्दकोशांद्वारे होत असते. आजच्या, आत्ताचे भाषेचे स्वरूप निश्चित करण्याच्या दृष्टीने अभ्यासकांना अशा तऱ्हेच्या अद्यावत कोशांची फार मोठी गरज असते. वर उल्लेख केलेल्या शब्दकोशांचे काम करत असताना मराठीतील कोश अद्यावत नाहीत; तसेच शुद्धलेखन व व्याकरणातील विविध बाबी याबाबत त्यांच्यामध्ये सुसूत्रतता, एकवाक्यता नाही ही बाब प्रकर्षाने जाणवत राहिली.

शब्दकोश आढळलेल्या त्रुटी शब्दीय (लेक्सिकल) व व्याकरणीय (ग्रमॅटिकल) ह्या दोन्ही प्रकारच्या होत्या.

दैनंदिन वापरात असणाऱ्या शब्दांची नोंदच शब्दकोशात नसणे ही महत्त्वाची उणीव होय. दैनंदिन वापरात असणाऱ्या; परंतु शब्दकोशात न नोंदलेल्या शब्दांची काही उदाहरणे पुढीलप्रमाणे -

(१) गुप्तचर - प्रचलित मराठीमध्ये सहसा हा शब्द विशेषण म्हणून वापरला जातो. जसे 'गुप्तचर संस्था', 'अमेरिकी गुप्तचर संस्थेचा अहवाल' इत्यादी. ह्या शब्दाचा नाम म्हणून वापर हिंदीत होतो. मराठीमध्ये हिंदीतील 'गुप्तचर'ला 'गुप्तहेर' हा शब्द जास्त रूढ आहे. 'गुप्तचर' नाम म्हणूनही वापरलेले आढळते पण असे प्रयोग मराठीत विरळाच आहेत. वृत्तपत्रीय बातम्यांत 'गुप्तचर' हा शब्द, विशेषतः दहशतवादी कारवायांच्या संदर्भात, वरचेवर वापरलेला आढळतो. (उदा० गुप्तचर

संस्थांचा सावधानतेचा इशारा) वाङ्मयातही काही उदाहरणे आढळतात (उदा० 'तुझे गुप्तचर येऊन न च का वार्ता ही सांगती' ग०दि० माडगूळकर, *गीतरामायण*) मात्र मराठी शब्दकोशांत गुप्तचर गुप्त झालेला दिसतो.

(२) धांदरट - इंग्रजीतील inattentive ह्या विशेषणाशी मिळताजुळता अर्थ व्यक्त करण्यासाठी मराठीत 'धांदरट' हे विशेषण वापरले जाते. धांदरट म्हणजे चलाख, चटपटीत नसलेला, लक्षपूर्वक काम न करणारा, गडबडलेला. धांदरट त्या विशेषणापासून तयार झालेले/ 'धांदरटपणा' हे गुणवाचक नामही मराठीत आढळते. 'धांदरट' हा शब्द काही वेळा 'धांद्रट' असाही लिहिला गेलेला दिसतो. (उदा० 'कोण भीमीचा भाचा ना? धांद्रटच आहे ते एक' पु०ल० देशपांडे *व्यक्ती आणि वल्ली*). मोल्सवर्थ तसेच सरमोकदम ह्या दोन्ही शब्दकोशांत 'धांदरणे' हे क्रियापद नमूद केलेले आहे. मात्र 'धांदरट' हे विशेषण व 'धांदरटपणा' हे गुणवाचक नाम वर उल्लेखलेल्या दोन्ही शब्दकोशांत आढळत नाही. घाबरणे-घाबरट, भेदरणे-भेदरट तद्वतच धांदरणे-धांदरट असे म्हणता येईल. परंतु घाबरणे, भेदरणे ही क्रियापदे प्रचलित मराठी भाषेत वापरली जाणारी आहेत. मात्र धांदरणे हे क्रियापद प्रचलित भाषेतून बाहेर गेलेले आहे. 'धांदरट' ह्या विशेषणाची नोंद फक्त नवनीत मराठी-इंग्लिश डिक्शनरीत आढळते. मात्र 'धांदरटपणा' ह्या नामाची नोंद कुठेही आढळत नाही.

(३) बोलाई/बोलाईचा - बोलाई (बोल्हाई) म्हणजे मेंढी व बोलाईचे (बोल्हाईचे) मटण म्हणजे मेंढीचे मांस. मांसाहारी मराठी भाषकांपैकी एक मोठा वर्ग फक्त बोलाईचे मटण खाणारा आहे. त्यामागे धार्मिक परंपरा आहे. अगदी पुण्यासारख्या शहरातही 'ताजे स्वच्छ बोलाईचे मटण मिळेल' किंवा 'बोलाई मटणाची खाणावळ' अशा पाट्या (अगदी टिळक पथ परिसरातही!) दिसतात. मात्र बोलाई किंवा बोलाईचे मांस ही नोंद मोल्सवर्थपासून नवनीतपर्यंत कोणत्याही शब्दकोशात दिलेली नाही. मोल्सवर्थला शब्दकोश बनवण्याच्या कामी साहाय्य करणारी मंडळी शास्त्री, पंडित असल्याकारणाने त्यांची मांसाहाराबाबतची अनभिज्ञता अथवा पूर्वग्रह समजण्यासारखा आहे. परंतु त्यानंतरच्याही अनेक शब्दकोशांनी बोलाईसारख्या इतर मांसाहारी अथवा मत्स्याहारी संज्ञांची दखल घेतल्याचे दिसत नाही. मराठीतून युरोपीय भाषांत किंवा युरोपीय, भाषांतून मराठीत भाषांतरे करताना ह्या आणि अशा शब्दांची दखल घेणे भाग पडते. युरोपीय समाज प्रामुख्याने मांसाहारी असल्याने विविध प्राण्यांच्या मांसासाठी निरनिराळ्या संज्ञांचा वापर केला जातो. याच कारणास्तव आमच्या शब्दकोशात बोलाई/बोलाईचे मटण यांना स्थान मिळाले आहे.





अनुक्रमणिका

(४) फाइल - इंग्रजीतून मराठीत येऊन रुळलेला (उदा० फाईल-स्त्रीलिंगी, एकवचनी सामान्य रूप - फाइली/फायली; अनेकवचन फाइली/फायली; अनेकवचनाचे सामान्य रूप फाइली/फायली) दैनंदिन कार्यालयीन व्यवहाराचा भाग झालेला हा शब्द कोशांमध्ये नोंदलेला नाही. इंगजीतून मराठीत येऊन स्थिरावलेले अनेक शब्द सध्या रूढ आहेत. जसे स्टेशन, मास्तर, बस, बँड इ०. अशा शब्दांच्या लेखनाचे प्रमाणीकरण व त्यांचे वर्गीकरण मराठी शब्दकोशांत अद्यापही समाविष्ट नाही.

(५) आत्ता -मराठीमध्ये पूर्वी सध्या, सांप्रत, वर्तमानात या अर्थाने तसेच ह्या क्षणाला ह्याही अर्थाने 'आता' हे क्रियाविशेषण वापरले जात असे. ह्या दोन अर्थच्छटांखेरीज इतरही काही अर्थच्छटा 'आता' ह्या क्रियाविशेषणाने दाखवल्या जात असत. (उदा० 'आता तेयां शशी । अर्जुना जाण आपैसी।' *ज्ञानेश्वरी;* 'आता कोठे द्यावे मन।' तुकाराम इत्यादी. मात्र हल्ली, सध्या, सांप्रत, वर्तमानात, इथून पुढे ह्या अर्थी 'आता' तर चालू क्षणाला ह्या अर्थाने 'आत्ता' हे क्रियाविशेषण वापरले जाते. 'आत्ता' हा शब्द केवळ मौखिक स्वरूपात वापरला जात नसून त्याला लिखित भाषेतही स्थान मिळाले आहे. मात्र शब्दकोशांनी 'आता' आणि 'आत्ता' ह्या दोहोंमधल्या भिन्नत्वाची नोंद घेतलेली नाही.

: ३ :

वर उल्लेख केलेले शब्द भिन्नभिन्न गटात मोडणारे आहेत. दैनंदिन व्यवहारात वापरात असूनही शब्दकोशात त्यांची नोंद झालेली नाही. अशा तऱ्हेच्या शब्दीय त्रुटींबरोबरच भाषेच्या प्रमाणीकरणाच्या संबंधानेही काही त्रुटी मराठी शब्दकोशांमध्ये दिसून येतात. भाषेच्या प्रमाणीकरणाच्या त्रुटींपैकी पहिली व महत्त्वाची त्रुटी म्हणजे अकारविल्हे लावण्यात येणारा शब्दांचा क्रम. यामध्ये अनुस्वारयुक्त आद्य अक्षर असणाऱ्या शब्दांबाबत (जसे कंगवा, कांजी, केंद्र इत्यादी) शब्दकोशांनी वेगवेगळी भूमिका घेतलेली दिसते. त्यामध्ये एकवाक्यता नसल्याने अभ्यासकांची मोठीच अडचण होते.

: ४ :

इंग्रजीतून मराठीमध्ये आयात झालेले आद्याक्षरी शब्द (अॅब्रीव्हिएशन्स) मराठीमध्ये कसे लिहावयाचे याविषयी कोणतेही सर्वमान्य नियम उपलब्ध नाहीत. त्यामुळे टि.व्ही., टिव्ही, टीव्ही किंवा पीएच्डी, पी०एच्०डी व पीएच्०डी० असे बहुविध पर्याय वापरात असलेले दिसतात.

व्याकरणीय त्रुटींमध्ये प्रामुख्याने शब्दांच्या वर्गीकरणामध्ये त्रुटी आहेत असे लक्षात येते. जसे एखाद्या शब्दाची गणना नाम अशी करावी, विशेषण अशी करावी की क्रियाविशेषण अशी करावी, अशा तऱ्हेचे काही प्रश्न उद्भवताना दिसतात. व्याकरणीय त्रुटी ढोबळमानाने पुढील तीन गटांत विभागता येतील.

**५.१ विशेषणे व क्रियाविशेषणे** - विशेषणे गुणवाचक (अॅट्रीब्युटीव्ह) व विध्यर्थी (प्रेडिकेटिव्ह) अशा दोन प्रकारची असतात. उदाहरणार्थ 'अटळ परिणाम' (गुणवाचक विशेषण) व 'मरण अटळ आहे' (विध्यर्थी वापर). वरचेवर विध्यर्थ किंवा प्रेडिकेटिव्ह म्हणून वापरले गेलेले विशेषण कालांतराने भाषेत क्रियाविशेषण म्हणून स्थिरावू शकते. तसेच 'होणे' व 'असणे' ह्या विध्यर्थ्याच्या नमुनेदार (टिपिकल) क्रियापदांखेरीज इतरही क्रियापदांबरोबर वापरले जाते. जसे :

( अ) अस्पष्ट अक्षर; मला अस्पष्ट दिसते.

(आ) अथक प्रयत्न; प्रक्रिया अथक चालू आहे.

( इ ) वेगळा पर्याय; तो वेगळा राहू लागला.

विध्यर्थाचा भाग म्हणून येऊन क्रियाविशेषणासारखी वापरली जाणारी विशेषणे क्रियाविशेषणे म्हणून नोंदली गेली पाहिजेत.

शब्दकोशांमध्ये विशेषणे म्हणून नोंदवलेले, परंतु व्यवहारात बव्हंशी क्रियाविशेषणे म्हणूनच वापरले जाणारे दोन शब्द म्हणजे 'शक्य' आणि 'कबूल.' 'शक्य' क्रियाविशेषण म्हणून होणे, असणे, करणे अशा अनेक क्रियापदांसोबत वापरले जाते. याचा वापर गुणवाचक (अॅट्रिब्युटिव्ह) विशेषण म्हणून केलेला वापर प्रचलित मराठीत तरी फारसा आढळत नाही. 'कबूल'च्या बाबतही हेच म्हणता येईल. 'कबूल' क्रियाविशेषण म्हणून करणे, असणे, होणे त्या क्रियापदांसोबत वापरले जाते.

**५.२ विशेषणे व नामे** - अनेक गुणवाचक विशेषणे भाषेमध्ये नामे 'सबस्टँटिव्ह् नाउन्स' म्हणून स्थिरावू शकतात. मराठीतील काही गुणवाचक विशेषणे, उदा० जंतुनाशक, कीटकनाशक, मृत, जखमी, जिवलग, अनाथ, नापास इ० नामे म्हणून वापरली जाताना दिसतात. जसे 'रासायनिक कीटकनाशकांचा बेसुमार वापर', 'अपघातातील मृतांची संख्या', 'जखमींच्या नातेवाइकांनी रुग्णालयात संपर्क साधावा', 'जिवलगांचा निरोप घेणे', 'देव अनाथांचा नाथ आहे', 'नापासांची शाळा' इत्यादी. वर उल्लेख केलेली सर्व विशेषणे नामे म्हणूनही वापरली जात आहेत. शब्दकोशात त्यांची 'नामे' अशी नोंद होणेही अगत्याचे आहे.

**५.३ सकर्मक किंवा अकर्मक क्रियापदे** - पूर्वी सरसकट अकर्मक म्हणून गणली गेलेली काही क्रियापदे खरोखरच फक्त अकर्मक म्हणूनच वापरली जातात का, हे तपासून पाहणे गरजेचे आहे. उदाहरणार्थ 'चुकणे' हे क्रियापद मोल्सवर्थ व सरमोकदम ह्या दोन्ही शब्दकोशांत अकर्मक क्रियापद म्हणून नोंदले गेले आहे. नवनीत मराठी इंग्लिश शब्दकोशामध्ये चुकणे, to err, अयोग्य गोष्ट करणे, नको ते करणे, अपराध करणे या अर्थाने अकर्मक, तर चुकणे to miss, हुकणे, व्हायचे ते टळणे या अर्थाने सकर्मक क्रियापद म्हणून नोंदवले आहे. 'चुकणे' ह्या सकर्मक क्रियापदाची व्याप्ती इतरही काही

शब्दांपर्यंत पोचली आहे, जसे : वाट चुकणे, रस्ता चुकणे, चित्रपटाची सुरुवात चुकणे इत्यादी. ह्या अर्थाने 'चुकणे' ह्या सकर्मक क्रियापदाविषयींची नोंद अधिक तपशिलाने होणे गरजेचे आहे.

'रागावणे' हे क्रियापद सर्वच शब्दकोशांत अकर्मक म्हणून नोंदवले गेले आहे. 'तो माझ्यावर रागावला आहे' किंवा 'ही बातमी ऐकून राजा रागावला' यांसारख्या वाक्यांमध्ये 'रागावणे' हे क्रियापद निश्चितपणे अकर्मक आहे. परंतु सध्या मराठीमध्ये 'रागावणे' हे क्रियापद to scold ह्या अर्थानेसुद्धा वरचेवर वापरले जाते. जसे, 'तुला कोणी रागावलं का? काही बोललं का?' किंवा 'शिक्षक विद्यार्थ्यांना रागावले.' ह्या अर्थाने 'रागावणे' क्रियापद सकर्मक आहे. To scold ह्या अर्थी 'रागावणे' ह्या क्रियापदाची नोंद नाही. To scold ह्या क्रियापदाला समानार्थी म्हणून 'रागे भरणे' ह्या वाक्प्रचाराचा उपयोग होत असे. परंतु चालू काळातील मराठी भाषेत 'रागे भरणे' हा वाक्प्रचार जवळजवळ वापरला जातच नाही. गमतीची गोष्ट अशी की ऑक्सफर्ड इंग्लिश-मराठी डिक्शनरीत (रमेश धोंगडे, OUP, New Delhi, 2003) To scold ह्या क्रियापदाचा अर्थ 'रागावणे' असा दिलेला आहे.

५.४ ह्या खेरीज 'ऊन कृदन्त व क्रियापद'; जसे 'करून टाकणे', 'मरून जाणे', 'फेकून देणे' यांसारख्या मराठीत वरचेवर येणाऱ्या बहुपदी रचनांची नोंदही शब्दकोशांनी घेणे गरजेचे आहे असे वाटते.

शब्दकोशांची मदत घेऊन काम करताना जाणवणाऱ्या काही ठळक त्रुटींची नोंद इथे घेतलेली आहे. सतत बदलत्या भाषेचा वेध घेत अद्यावत कोशनिर्मिती मराठीत करणे अतिशय गरजेचे आहे. संस्थात्मक पाठबळ, आर्थिक मदत व तज्ज्ञांची उपलब्धता ह्या तीनही गोष्टींची मराठीत वानवा आहे असेही नाही. असे असता मराठीत कोशनिर्मितीचे काम का उभे राहू शकत नाही? ■

**प्रगतीचा झपाटा**

तांत्रिक बदलांचा झंझावात १९८५-८६ पासून जाणवू लागला. बदलांचा खरा प्रभाव घडला तो दळणवळणामध्ये आणि जीवतंत्रज्ञानामध्ये. एका दशकाच्या अवधीत पेजरपासून मोबाईल.... मोबाईलमधून आयपॉड असे अनेक चमत्कार घडत गेले. दुसऱ्या बाजूला संगणकावर इंटरनेट आलं. इंटरनेटनं सारी दुनिया अक्षरशः बोटाच्या शेंड्यावर आणून उभी केली. आणि जीवतंत्रज्ञानानं डीएनए कोड उलगडून मनुष्यजातीच्या जन्माची कुंडली मांडली. मानवाचं क्लोनिंग अजून दूरच्या टप्प्यावर असलं तरी माणसाला दोनशे वर्षांचं आयुर्मान सहज गाठता येईल इतकी प्रगती पेशीतंत्रज्ञानात झाली आहे. म्हणजे अमरत्वच की! त्यातून निर्माण होणाऱ्या प्रश्नांचा नुसता विचार करा......

- दिनकर गांगल





अनुक्रमणिका

# बा०भ० बोरकरांचे अप्रकाशित साहित्य

सुमन बेलवलकर

[परीक्षित पुस्तक : बा०भ० बोरकरांचे अप्रकाशित साहित्य; संपादक - प्रा० अरुणा गानू आणि श्रीराम पांडुरंग कामत. प्रकाशक - कला आणि संस्कृती संचालनालय, गोवा सरकार, पणजी, गोवा ४०३००१. पृ० २५१. किंमत रु० ३००]

२०१० हे कविवर्य बा०भ० बोरकरांचे जन्मशताब्दी वर्ष. त्या निमित्ताने गोवा सरकारने प्रकाशित केलेल्या 'बा०भ० बोरकरांचे अप्रकाशित साहित्य' या स्फुट लेखसंग्रहाच्या मुखपृष्ठावर बोरकरांचे छायाचित्र आणि **'महात्मायन'** या त्यांच्या संकल्पित महाकाव्याचा त्यांच्या हस्ताक्षरातील ठसा आहे. गांधीजी बोरकरांच्या हस्ताक्षराला 'मीठा' म्हणत, त्याची साक्ष या अक्षरावरून पटते. या संग्रहात बोरकरांच्या प्रामुख्याने ३२ गद्यरचना आणि **'महात्मायना'**च्या पहिल्या सर्गासह अन्य काही पद्यरचनांचा समावेश आहे.

या संग्रहात समाविष्ट झालेले बोरकरांचे साहित्य संमिश्र स्वरूपाचे आहे. आई, वडील आणि सहधर्मचारिणी रुक्मिणीबाई या कुटुंबीयांसंबंधीचे लेख तसेच सोहिरोबा आंबिये, पु०शि० रेगे, जगन्मित्र पी०एल०, डॉ० भाऊ दाजी अशा व्यक्तींविषयीचे लेख या संग्रहात आहेत. काही लेख काव्य-निर्मितीविषयक आणि आठवणीवजा आहेत. गीताई, पुराण-वस्तुसंग्रहालय, जातीयता यांच्या विषयीचे विचार काही लेखांतून वाचायला मिळतात; तर गोव्यातल्या काही ठिकाणांविषयी माहिती देणारे जवळजवळ बारा लेख या संग्रहात आहेत. 'महामाता कुंती' हा महाभारतावर आधारित व्यक्तिचित्रवजा लेखही या संग्रहात आहे. बरेचसे लेख जीवनाच्या संध्याकालीन अवस्थेत लिहिले गेल्याने त्यांत स्मृतिरंजनाचे रंग येणे अपरिहार्य आहे.

आपल्या आईविषयी बोरकर लिहितात, 'मैनेसारखी मोकळ्या हवेत आणि माया-ममतेत वाढलेली माझी आई आमच्या घरात अक्षरशः पिंजऱ्यात सापडली (पृ० २४). माहेरचे नाव मोगरा असलेली आई फुललेल्या बटमोगऱ्यासारखी नेहमी प्रफुल्ल असायची. (पृ० २५). ती हजार स्त्रियांत उठून दिसावी इतकी देखणी, विलक्षण कष्टाळू, तल्लख बुद्धीची, व्युत्पन्न आणि बहुश्रुत आणि त्याचबरोबर मानीही होती. ''मी पोटी असताना रात्रीच्या रात्री जागून आपण संपूर्ण हरि नारायण वाचल्याचे ती सांगे.'' (पृ० २४)

''मला उडायला लागणारी फांदी पुरवली ती तिनेच (पृ० २८) असे तिच्याविषयी बोरकर कृतज्ञतेने लिहितात. चित्रकार बोरकर आपल्या वडिलांचे शब्दचित्र बारकाव्यांनिशी काढतात (पृ० ३३). आपल्या वडिलांनी चौतीस लग्ने लावून दिली; औषध आणायला पणजीला गेलेले ते थेट मुंबईला संयुक्त मानापमानाच्या प्रयोगासाठी गेले आणि पंधरा दिवसांनी त्यांना परत आणावे लागले. चहा आणायला दुकानात गेले तर चांगला दिसला म्हणून क्रॉकरीचा सेट घेऊन घरी आले! धोब्याच्या घराची पेटती तुळई खांदा लावून फेकून दिली आणि घर भस्म होण्यापासून वाचवले; तेच घर आपला लाकूडफाटा देऊन झाकूनही दिले. अशा वडिलांविषयीच्या कितीतरी अघटित गोष्टी बोरकरांनी सांगितल्या आहेत. बोरकरांचे लग्न त्यांनी आजीला मरताना दिलेल्या शब्दाप्रमाणे तिच्या नात्यातल्या मुलीशी झाले. त्या वेळी ते जेमतेम विशीत होते. ''चिमुकल्या पावलांची, स्थूल बांध्याची, ठेंगणी ठुसकी... मूर्ती मला देवळातल्या ठाणदेवीसारखी वाटली.'' (पृ० ३८) असे त्यांनी आपल्या पत्नीचे वर्णन केले आहे. कल्पनेतल्या कविवधूहून वेगळी वाटल्यामुळे स्वप्नभंग झालेल्या या कवीने त्या वेळी रडूनही घेतले. तारुण्यातली आपली उत्कट तरलता आणि पत्नीचा सखोल संथपणा यातला विरोध त्यांनी मनमोकळेपणे मांडला आहे.

८-९। 'श्री० सोहिरोबानाथ आंबिये' या तुलनेने दीर्घ लेखात बोरकरांनी ज्ञानेश्वर परंपरेतील संतकवी सोहिरोबानाथ यांचे चरित्र आणि कवितेची ओळख करून दिली आहे. सोहिरोबांची कविता विस्तृत टिपांसह प्रसिद्ध करताना लिहिलेली ही प्रस्तावना आहे. मराठी, हिंदुस्थानी, संस्कृत आणि कोकणी या भाषांवर प्रभुत्व असलेल्या सोहिरोबांनी कोकणीत लेखन केले नाही - मराठीत विपुल लेखन केले. घरच्या गरिबीमुळे कागदाअभावी सोहिरोबांची बहीण फणसाच्या कोवळ्या पानांवर कविता लिहून ठेवत असे. त्याची कल्पना नसल्याने त्यांच्या आईने ते सर्व न्हाणीच्या चुलीत घातले ही त्यांची आठवण चटका लावणारी आहे (पृ० ५१). बोरकरांच्या अनुभवविश्वात त्यांना होणाऱ्या भासांना फार महत्त्व आहे. त्यांच्या आत्मवृत्ततही त्यांनी असे प्रसंग वर्णन केले आहेत. योगी अरविंदांची भेट, त्यांच्या निर्वाणाचे स्वप्नात झालेले दर्शन हा विलक्षण अनुभव बोरकरांनी अरविंदांवरच्या एका छोट्या लेखात वर्णन केला आहे.

पु०शि० रेग्यांवरच्या दोन पानी मृत्युलेखात बोरकरांनी रेग्यांच्या ओसरत्या वयातील प्रतिभा-तारुण्याचा उल्लेख केला आहे (पृ० ६७). जगन्मित्र पी०एल० यांच्यासाठी 'कर्तृत्वाने सिकंदर, वृत्तीने कलंदर व म्हटला तर बिलंदर' अशी शब्दावली त्यांनी शीर्षकातच वापरली आहे. बोरकर म्हणतात, 'पी०एल०च्या एका डोळ्यात टागोर आहेत, दुसऱ्यात चार्ली चॅप्लीन आहेत. एकाने ते संगीत पाहतात आणि दुसऱ्याने विसंगती हेरतात (पृ० ७३). मुंबईचे भाग्यविधाता डॉ० भाऊ दाजी लाड आणि पोर्तुगीज भाषेतील कवी आंतॉनियु आलैशु यांच्यावरचे छोटेखानी लेखही या व्यक्तिपर गटात आहेत.

या पुस्तकात बोरकरांचा काव्यनिर्मितीविषयक एक लेख आणि काही आठवणी-वजा लेख यांचा एक तिसरा गट आहे. काव्यनिर्मितीमागची प्रक्रिया बोरकरांनी इथे थोडक्यात वर्णन करून सांगितली आहे. 'या वेळी अर्थातच हा जीव जाणीव (कॉन्शस) किंवा नेणीव (सबकॉन्शस) या पातळ्यांवर निश्चित नसतो तर जाणिवेनेणिवेपेक्षा वेगळ्या उच्च (सुपरकॉन्शस) पातळीवर असतो' असा त्यांचा सिद्धान्त आहे (पृ० ८३). काव्याचे रूपलावण्य, भावलावण्य आणि आत्मलावण्य सांगून कवितेतील शब्दांचे महिमानही त्यांनी वर्णन केले आहे. बोरकरांच्या काव्यात संगीताला अनन्यसाधारण महत्त्व होते. बोरकर याला अंत:संगीत म्हणतात. 'मंतरलेले दिवस', 'मैत्री', 'वृद्धत्वी निज शैशवास जपणे', 'सख्यभक्ती', 'कांचनसंध्या', 'गीताये'ची कथा असे आणखी काही आत्मपर छोटेखानी निबंध या पुस्तकात समाविष्ट केलेले आहेत. एका अर्थाने त्यांच्या प्रौढ वयातील हे आत्मवृत्तच आहे.

गोंयकार बोरकरांचे आयुष्याच्या उत्तरकालात गोव्याच्या भूमीबद्दलचे नाते अधिकच गहिरे झाले. 'सांस्कृतिक गोमंतक' या दीर्घ लेखात बोरकरांनी गोव्याची सात हजार वर्षांची प्राचीन परंपरा, बदलत्या कालखंडातील गोव्याचा विस्तार, गोव्याचे भौगोलिक विशेष, तिथला विलोभनीय समृद्ध निसर्ग यांची तपशीलवार माहिती दिली आहे. त्याचप्रमाणे कोकणात कालानुरूप वस्तीला आलेल्या निरनिराळ्या वंशांचीही माहिती दिली आहे. गोव्यातली कुटुंब, कुळ ही संस्था किती सर्वसमावेशक आहे ते त्यांनी तिपलभाऊ, चोपलभाऊ यांची उदाहरणे देऊन दाखवले आहे. गोव्यातली ग्रामराज्ये आणि तिथली देवळे यांना गोव्याच्या सांस्कृतिक जीवनात अनन्यसाधारण महत्त्व आहे. दियोगु फेर्नांदिश याने एकट्या सासष्टी तालुक्यात तीनशे देवळे जमीनदोस्त केली होती. तरीही पोर्तुगीजांच्या आक्रमणापासून गोव्याची संस्कृती टिकवण्याचे काम या देवळांनी केले असे बोरकरांचे मत आहे. याशिवाय हेमांडपती शैलीचे तांबडे सुर्लचे शिवालय, संत फ्रान्सिस झेवियरचे शव जतन करून ठेवलेले जुन्या गोव्यातील शुभंकर येशूचे महामंदिर, गोमंतकीय राजधानी पणजी, सफ्फा मशीद, वरंड्याचा वीरगळ, सप्तकोटीश्वर, पारोडेचा चंद्रनाथ, आग्वादचा जलदुर्ग, गोमंतकाची अधिष्ठात्री शांतादुर्गा यांच्याविषयीही बोरकरांनी लिहिलेले आहे.

बोरकरांच्या अप्रकाशित लेखांचे संपादन करताना संपादकांनी त्यांचे विषयवार गट पाडले आहेत. यांपैकी कोणत्याही गटात समाविष्ट न झालेला एक लेख या पुस्तकात आहे तो म्हणजे 'महामाता कुंती.' बोरकरांच्या मते कुरुकुलाच्या वास्तुदेवतेपुढे कांचनाच्या समईसारखी अखंड तेवत असलेली व्यक्ती म्हणजे कुंती. तिने कपाळीच्या दुर्धर दु:खाला शिवभस्माची प्रतिष्ठा मिळवून दिली.

या पुस्तकाच्या पद्यविभागात आजवर अप्रकाशित असलेल्या 'महात्मायन' या दीर्घ

काव्याचा पहिला सर्ग आहे. या रचनेवर ज्ञानेश्वरीची बरीच छाप आहे. 'लाच' या कलियुगातील ईश्वराचे श्रीलंचेश्वर पुराण, धन्याष्टक, कचदेवयानीविषयीची संजीवनी ही आकाशवाणीवरील संगीतिका यांचाही समावेश या पद्यविभागात आहे. तथापि कवी बोरकरांचे खरे सामर्थ्य गेय स्फुटरचना हे आहे. वर्णनात्मक, खंडकाव्यात्मक दीर्घकविता हा त्यांचा पिंड नाही. या पुस्तकात संग्रहित झालेले गद्य त्यांनी लिहिले खरे; पण कदाचित ते छापण्यासाठीही लिहिले नसावे इतके काही लेख अगदी स्फुट स्वरूपाचे आहेत. इरावती कर्वे, दुर्गा भागवत, रा०भि० जोशी यांच्याप्रमाणे ललित गद्याची दृष्टी आणि शैली बोरकरांच्या या संग्रहात दिसत नाही. ज्या स्थळांचे स्थानमाहात्म्य त्यांनी वर्णन केले आहे त्यांची माहिती पुरातत्त्वीय अभ्यासातून प्राप्त झालेली नाही. कुटुंबियांसह त्यांची व्यक्तिवर्णने व्यक्तीबद्दलची माहिती या सदरात राहतात. त्यामधून इरावती कर्व्यांच्या 'आजोबा'सारखी व्यक्तिरेखा साकार होत नाही. प्रत्येक लेखकाचे बलस्थान वेगळे असते हे इथे मान्य करावेच लागते. अर्थात बोरकरांच्या निज जीवनाविषयी माहिती देणारे अखेरचे पुस्तक या दृष्टीने हे वाचनीय निश्चित आहे. ■

### भांतू भाषा हद्दपार

भांतू नावाची एक भाषा भारतात आहे. ती अनेक प्रांतांमध्ये बोलली जाते. भांतू भाषा बोलणारे जवळजवळ ३० लाख लोक आहेत. पण तरी त्या भाषेचा भारताच्या जनगणनेत कुठेही उल्लेख नाही. १९७१च्या नाही, १९८१च्या नाही, १९९१च्या नाही. ही भाषा पंजाब, हरियाणा, उत्तर प्रदेश, राजस्थान, गुजरात, महाराष्ट्र एवढ्या राज्यांमध्ये बोलली जाते. पंजाबमध्ये ही भाषा बोलणाऱ्या लोकांना सांसी म्हणतात. हरियाणा, उत्तर प्रदेशात त्यांना बावरिया म्हणतात, राजस्थानमध्ये त्यांना कांजर म्हणतात, गुजरातमध्ये छाडा म्हणतात, महाराष्ट्रामध्ये या लोकांना काजारभाट म्हणतात. महाराष्ट्रापासून पंजाबपर्यंतचे लोक ही भाषा बोलतात आणि त्या भाषेमध्ये माझ्या सर्व्हेवरून मी जवळजवळ २३ नाटकं बघितलेली आहेत आणि त्यातील काही संकलित केली आहेत. पण या भांतू भाषेला कुठल्याच राज्यात स्थान नाही, कारण ही यांपैकी कुठल्याच राज्याच्या प्रमाण भाषेची बोलीभाषा नाही. भांतू ही मराठीची डायलेक्ट नाही, पोटभाषा नाही. पोटभाषा, उपभाषा, डायलेक्ट आणि रजिस्टर्स अशा प्रकारचे सिद्धान्त स्वीकारल्यामुळे भांतूसारख्या एका सबंध, सतेज भाषेचा आपण नायनाट करत आहोत.

गणेश देवी, *मौखिकता आणि लोकसाहित्य*

**पुस्तक-परीक्षण**

# लॅटिन नव्हे; पोर्तुगीज व फ्रेंच संस्कार

नीलिमा गुंडी

: १ :

[*बोरकर-काव्यसमीक्षा (१९३७ ते २००८)* - प्रा० एस०एस० नाडकर्णी. कला आणि संस्कृती संचालनालय. गोवा सरकार. पणजी. पृ० ५७६. रु० ५५०.]

मराठी काव्यपरंपरेत स्वत:चा ठसा उमटवणारे कविवर्य बा०भ० बोरकर यांच्या जन्मशताब्दीवर्षात *'बोरकर-काव्यसमीक्षा (१९३७ ते २००८)'* हा ग्रंथ प्रकाशित होण्यात मोठेच औचित्य आहे. एखाद्या कवीच्या गाजलेल्या कवितेवरील परीक्षणांच्या संकलनासाठी विशेष प्रसिद्ध असलेल्या प्रा० एस०एस० नाडकर्णी यांनी हे काम केले आहे.

प्रस्तुत ग्रंथात बोरकरांच्या काव्यावरील तीस समीक्षालेख समाविष्ट असून सुमारे १५० पृष्ठांची विवेचक प्रस्तावना नाडकर्णी यांनी लिहिली आहे. त्यांनी निवेदनातच नमूद केले आहे की, बोरकरांवरील उपलब्ध असलेल्या सर्व समीक्षेची मी निवड केलेली नाही (पृ० ५). अर्थातच ग्रंथाला त्यामुळे मर्यादा पडल्या आहेत. अनुक्रमणिकेत लेखांच्या पृष्ठक्रमांकांची नोंद नसल्यामुळे लेखांच्या आकारमानाचा पटकन अंदाज येत नाही. काही लेख अतिविस्तृत तर काही अतिसंक्षिप्त आहेत. बोरकरांच्या काव्य-संग्रहांच्या पाच प्रस्तावना यात अंतर्भूत केल्या आहेत. 'जीवनसंगीत'ची वि०स० खांडेकर यांची प्रस्तावना, 'दूधसागर'ची काका कालेलकर यांची प्रस्तावना या अनुक्रमे १९३७ व १९४७ सालांतील म्हणजे जुन्या समीक्षा आहेत. याशिवाय गो०म० कुलकर्णी, रा०चिं० ढेरे व अरुणा ढेरे यांनी संपादित केलेल्या बोरकरांच्या काव्यसंग्रहांना त्यांनी लिहिलेल्या प्रस्तावनाही यात समाविष्ट आहेत. इतर लेखांमध्ये वा०ल० कुलकर्णी, रमेश तेंडुलकर, रा०ग० जाधव, वसंत आबाजी डहाके, प्रभा गणोरकर अशा कवितेच्या अभ्यासक मंडळींचे लेख आहेत. बोरकरांच्या काव्याचे विविध पैलू लक्षात यावेत, हा प्रयत्न असल्यामुळे काही वेगळे लेख यात आवर्जून घेतलेले दिसतात. 'रवींद्रनाथ टागोर आणि बा०भ० बोरकर' हा मृणालिनी गडकरी यांचा तौलनिक अभ्यासावर आधारित लेख तसेच 'पर्यावरणीय समीक्षेच्या चष्म्यातून' बोरकरांच्या कविता अभ्यासणारा नंदकुमार कामत यांचा लेख, ही अशी उदाहरणे आहेत.

प्रा० नाडकर्णी यांनी स्वत:ला 'संपादक' असे म्हटलेले नाही. तसा निर्देश हवा

होता. त्यांनी सुरुवातीलाच 'निवडीबद्दल मतभिन्नता राहू शकेल', असे म्हणून टाकले आहे. खरे तर बोरकरांवरील संदर्भसूची त्यांनीच तयार केली असल्यामुळे निवडीला खूप वाव होता. मात्र त्या दृष्टीने व्यापक बैठक स्वीकारून निवड करण्याचे धोरणच नसावे. कारण बोरकरांवर तयार केलेल्या खास विशेषांकांपैकी 'मांडवी' अंकातील तीन लेख 'आरती' अंकातील दोन लेख, 'बाकीबाव : एक आनंदयात्रा' (संपा० प्रा० कृष्णाजी कुलकर्णी) यातील तीन लेख; असे एकेका प्रकाशनातीलच अनेक लेख निवडण्यातील औचित्य कळत नाही. बोरकरांच्या गाजलेल्या कवितांवर लिहिलेली एखाददुसरी रसग्रहणे त्यात समाविष्ट व्हायला हरकत नव्हती. बोरकरांच्या स्मृतिप्रीत्यर्थ सुरू करण्यात आलेल्या 'कवितारती'च्या पहिल्याच बोरकर विशेषांकातील (१९८५) एकही लेख यात का समाविष्ट नाही असा प्रश्न पडतो. या निवडीचे निकष समोर न ठेवल्यामुळे अपेक्षाभंगही होतो.

या समीक्षालेखांमधून बोरकरांच्या काव्याचे ठळक असे सर्वसामान्यत: एकमत असलेले काव्यविशेष लक्षात येतात. त्यांच्या काव्यातील नादसौंदर्य, प्रतिमासृष्टी, निसर्गसंवेदन, गेयता, तांबे यांचा प्रभाव आणि मर्ढेकरयुगात त्यांनी राखलेले स्वत:चे वेगळेपण, 'महात्मायन'च्या निर्मितीतील अपयश इत्यादी बाबींचा विचार यात झालेला दिसतो. नाडकर्णी यांनी 'बोरकर-काव्यसमीक्षेच्या निमित्ताने' या १५० पानी विवेचक प्रस्तावनेत मुख्यत: याच मुद्द्यांचा परामर्श घेतला आहे. प्रा० नाडकर्णी यांच्या प्रस्तावनेत प्रथमच चर्चेला आलेला मुद्दा म्हणजे 'बोरकरांच्या काव्यावर 'लॅटिन संस्कृती'चा प्रभाव असतो,' या बहुचर्चित विधानातील 'लॅटिन संस्कृती' या अतिव्याप्त शब्दप्रयोगाची झालेली चिकित्सा होय. समीक्षेमध्ये जाताजाता उच्चारलेला शब्द कसा केंद्रवर्ती होऊन बसतो, याचे हे उदाहरण ठरते. प्रा० नाडकर्णी यांनी 'लॅटिन संस्कृती' या शब्दप्रयोगामध्ये वास्तविक किती भाषांचा अभ्यास अपेक्षित आहे, हे नोंदवले आहे. 'लॅटिन संस्कृती'त लॅटिन युरोप, लॅटिन अमेरिका व लॅटिन आफ्रिका असे तीन गट आणि सुमारे २० देश मोडतात. प्रत्यक्षात बोरकरांच्या काव्यावर 'लॅटिन' म्हणण्यापेक्षा 'पोर्तुगीज व फ्रेंच' संस्कार आहेत, असे म्हणणेच योग्य होते; तरीही सर्व समीक्षक एक दुसऱ्याची री ओढत राहिले, ही वस्तुस्थिती यानिमित्ताने उजेडात येते.

प्रा० नाडकर्णी यांनी प्रस्तावनेत समीक्षा लेखांतील मुद्यांचा परामर्श घेण्यावरच लक्ष केंद्रित केले आहे. वास्तविक एका कवीवरील मोठ्या कालखंडातील समीक्षेचा अभ्यास अभिरुचीच्या संदर्भातही काही रहस्ये प्रकट करीत असतो. तसेच समीक्षेचा कवीच्या पुढील काव्यनिर्मितीवर काही परिणाम झाला आहे की काय, याचाही वेध अशा अभ्यासातून सूक्ष्मरीत्या घेता येतो. प्रा० नाडकर्णी यांनी अशी दृष्टी न बाळगल्यामुळे प्रस्तावनेत बोरकरांच्या काव्याची ठरावीक वैशिष्ट्येच पुनरुक्त होत राहतात. ■





अनुक्रमणिका

**पुस्तक-परीक्षण**

# अभ्यासकांची सोय

नीलिमा गुंडी

[*बालकवी-बा०भ० बोरकर - संदर्भसूची.* प्रा० एस०एस० नाडकर्णी. कला आणि संस्कृती संचालनालय, गोवा सरकार, पणजी. पृ० ११८. किंमत रु० १५०]

प्रा. नाडकर्णी हे मुख्यतः संशोधक वृत्तीचे असल्यामुळे त्यांनी तयार केलेली संदर्भसूची अतिशय उपयुक्त आहे.

बोरकरांवर बालकवी यांचा सुरुवातीला असलेला प्रभाव लक्षात घेता बालकवी - बा०भ० बोरकर अशी गुरुशिष्यांची जोड-संदर्भसूची स्वतंत्र पुस्तकरूपात उपलब्ध करून देऊन नाडकर्णी यांनी काव्यरसिकांची मोठीच सोय केली आहे. ही सूची वर्णनात्मक असून त्यात एखादा लेख पुढे ज्या पुस्तकात समाविष्ट झाला त्या पुस्तकाचीही नोंद केली आहे. बालकवी व बोरकर यांच्यावरील खास अंक, पुस्तके, त्यांच्यावरील कविता, स्फुट समीक्षा, आठवणी अशा विविध संदर्भसाधनांचा यात आवर्जून समावेश केला आहे. बालकवींच्या 'औदुंबर' या एका कवितेविषयींची संदर्भसूचीच सात पृष्ठांची आहे, हे पाहिले की 'औदुंबर' या कवितेने अनेकांना कितीप्रकारे प्रभावित केले आहे, हे लक्षात येते. बोरकरांच्या संगीतबद्ध रचनांचाही सूचीत निर्देश केला आहे. इतकेच नव्हे, तर ललित साहित्यात झालेला बोरकरांच्या कवितांचा वापरही नोंदवला आहे. आजच्या पिढीतील महत्त्वाचे लेखक मिलिंद बोकील यांच्या 'शाळा' या कादंबरीत बोरकरांच्या 'चित्रवाणी' या कवितेचा वापर केला जाणे, ही गोष्ट बोरकरांचा वारसा पुढील साहित्यिकांनी सहज स्वीकारला असल्याचा निदर्शक आहे. क्वचित एखादी त्रुटी सूचीत राहून गेली आहे. उदाहरणार्थ रा०श्री० जोग यांनी 'जीवनसंगीता'चे 'सह्याद्री', जानेवारी १९३९मध्ये केलेले परीक्षण यात नोंदवलेले नाही. तसेच शुभांगी पातुरकर यांच्या लेखाची नोंद 'छंद : शास्त्रीय समीक्षा' (पृ० १०२) अशी चुकीच्या पद्धतीने झाली आहे. ती नोंद 'छंदःशास्त्रीय समीक्षा' अशी हवी.

अर्थात ही सूची खूपच परिश्रमपूर्वक तयार केली आहे. बालकवींवरील 'लोकराज्य'चा नोव्हें. १९९१चा इंग्रजी भाषेतील विशेषांक तसेच डी०एस० वज्रम यांनी बोरकरांच्या इंग्रजीत अनुवादिलेल्या कविता यांचीही यात नोंद वाचायला मिळते. अशा संदर्भसाधनांचा चिकित्सक वापर करण्याची प्रेरणा नव्या समीक्षकांना व्हावी, अशी अपेक्षा करणे योग्य होईल. ■

**पुस्तक-परीक्षण**

# जीवनाच्या सार्थकतेचा शोध

जया परांजपे

[परीक्षित पुस्तक : *...आणि शेवटी प्रार्थना* - अनुवादक : आनंद थत्ते. लोकवाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई. पृ० ८७. किं० रु० १२५]

श्री० आनंद थत्ते यांनी अनुवादित केलेली श्री० उदय प्रकाशांची *'और अंत में प्रार्थना'* ही हिंदीतील दीर्घकथा *'...आणि शेवटी प्रार्थना'* या नावाने लोकवाङ्मय गृह प्रकाशनाने पुस्तकरूपात प्रसिद्ध केली आहे.

पुस्तकाच्या प्रस्तावनेत अनुवादक श्री० थत्ते यांनी नमूद केलं आहे की, मानवी मूल्यांसाठी प्राणांतिक लढा देणाऱ्या सामान्य माणसाच्या या कथेने मी झपाटून गेलो व अनुवादाचे काम हाती घेतले. थत्ते यांची कथेबाबतची ही प्रतिक्रिया पुरेशी बोलकी आहे. तसे पाहिल्यास अनीतीच्या चक्रव्यूहात अडकलेल्या अभिमन्यूचा प्राणांतिक लढा ही महाभारतातील धर्मयुद्धाची कथा प्रतिमा बनून आजपर्यंत वेगवेगळ्या रूपांत समोर येत राहिली आहे. डॉ० वाकणकरांची (कथानायक) कथा व व्यथा नेमकी हीच आहे. संदर्भ बदललेले आहेत एवढंच.

महान संशोधक, थोर तत्त्ववेत्ते आणि राजकीय पुढाऱ्यांच्या ग्रंथांचे सखोल वाचन-मनन आणि उपजत बुद्धिमत्ता यांमुळे वाकणकरांच्यात वैज्ञानिक शोधवृत्ती, ईश्वरीय विधायक शक्तीवर गाढ श्रद्धा आणि जात्यभिमान जोपासला गेला होता. कर्तव्यनिष्ठा, प्रामाणिकपणा व माणुसकी ही तर त्यांच्या रक्तातच होती. त्यामुळे निष्णात डॉक्टर व तितकाच चांगला माणूस म्हणून ते जिथं जातील तिथं लोकप्रिय होत होते, आपल्या संशोधन व तत्संबंधी कार्यामुळे वैद्यकीय क्षेत्रात नावाजले जात होते. संघातील विधायक कामांमुळे तिथे नेतृत्व करत होते; पण तथाकथित व्यावहारिक जगात सहकाऱ्यांमध्ये व कधी-कधी घरच्यांमध्येही याच गुणांमुळे ते एकटे व नकोसे होत होते.

साथीच्या रोगावर नियंत्रण ठेवून माणसांचे प्राण वाचवण्यापेक्षा पंतप्रधानांच्या भेटीचे डोलारे माजविणाऱ्या, चुकीची-जुनी औषधं देऊन हरवंश पंडितसारख्या निरपराध लोकांचे बळी घेणाऱ्या, सत्ताधारी व धनदांडग्यांशी साटं-लोटं करून आपलं उखळ पांढरं करणाऱ्या आसुरी प्रवृत्तींच्या विरोधात उभे ठाकणाऱ्या डॉ० वाकणकरांना स्वाभाविकपणे अनेक संकटांना सामोरं जावं लागतं. अशा वेळी होणारी आपली घुसमट, कोंडमारा, अगतिकता यांना वाट करून देण्यासाठी ते डायरी लिहितात. डायरीतील त्यांची मनोगतं वा प्रश्न

हा या कथेचा गाभा आहे. मनापासून व निष्ठेने कर्तव्य करण्यात कोणता आदर्शवाद व अव्यावहारिकपणा आहे? हिंसेचा विरोध करणाऱ्या माझ्या कामानं नक्षलवादाला साथ कशी मिळते? सर्व चराचर जग एकाच विधात्याची सृष्टी असताना त्यातलाच एखादा आपल्या श्रेष्ठतेच्या अहंकाराने दुसऱ्यास नष्ट करण्यास का सरसावत असेल? सबलांनाच जगण्याचा हक्क असेल तर निर्बलांनी कुठं जावं? कोणताही राजकीय पक्ष शेवटी तोच सत्तेचा भ्रष्ट मुखवटा चढवणार असेल तर झटायचं कुणासाठी व का? नैतिकतेशी कुणालाच देणं-घेणं नसेल, व्यक्तिगत लाभ हाच माणसाचा स्वाभाविक धर्म बनला असेल, भ्रष्टाचार हाच शिष्टाचार असेल तिथं व्यक्ती, समाज आणि देशाच्या उज्ज्वल भविष्याची कल्पनाही दुरापास्त आहे. हे प्रश्न व त्या मागील मूल्यं उराशी बाळगून जगणाऱ्या वाकणकरांच्या भोवती सामान्यांना देशोधडीस लावून, पर्यावरणाचा ऱ्हास करून विकास साधू पाहणारे उद्योगपती, आधुनिकतेच्या नावाखाली पैशाला व चंगळवादाला खतपाणी घालणारी धोरणं, त्याला बळी पडून पथभ्रष्ट झालेली पिढी व त्यांची घातक कृत्यं असं दूषित पर्यावरण आहे. या सगळ्यांत त्यांचं जगणं, श्वास घेणं, उभं राहणं आणि लढणं जास्तीत जास्त जीवघेणं होऊ लागलं होतं.

तशातच त्यांच्या गावातील कॉलेजमधील दोन मुलांच्या दुकानदाराशी झालेल्या किरकोळ भांडणाचं रूपांतर हिंसाचाराच्या घटनेत होतं. सांप्रदायिक शांतिसेनेचा प्रामाणिक तरुण कार्यकर्ता तौफिन अहमद पोलिसांच्या गोळीबाराला बळी पडतो. मग या घटनेला सांप्रदायिक आणि राजकीय रंग देऊन पोलीस, प्रशासक, मंत्री व त्यांचे पोसलेले गुंड बचावासाठी डॉ० वाकणकरांवर शवविच्छेदनाचा खोटा व त्यांना अनुकूल रिपोर्ट लिहिण्यासाठी दबाव आणतात. डॉ० वाकणकर या क्रौर्याने मनातून तडफडतात, धास्तावतात व खचूनही जातात; पण शेवटच्या क्षणी जगतूनियंत्या गणेशाचं स्मरण करून वेगळ्याच शक्तीने भारावल्यागत तौफिनच्या मृत्यूचं खरं कारण लिहून टाकतात; पण त्याचे होऊ शकणारे भयंकर परिणाम आपल्या बायको वा मुलींना भोगावे लागतील या कल्पनेने ते तिथेच कोसळतात. त्यांच्यावर तातडीने उपचार सुरू होतात. शांततेचे, सामंजस्याचे प्रयत्न करण्याच्या अपराधासाठी मारल्या गेलेल्या तौफिनचा बर्फावर ठेवण्यात आलेला मृतदेह, अतिदक्षताविभागामध्ये मृत्यूशी झुंज देत पडलेले डॉ० वाकणकर आणि या सर्व घटनेवरील माध्यमांची व प्रशासनाची कोरडी, थंड आणि औपचारिक प्रतिक्रिया या बिंदूवर कथा संपते. पण वाचकाच्या मनात मात्र अधिकाधिक खोल उतरत जाते, रेंगाळत राहते.

'डॉ० दिनेश मनोहर वाकणकर : एक परिचय' अशासारख्या साध्या, सूचनात्मक शीर्षकांमधून कथा, अनेक घटना, प्रसंग, पात्रं आणि संदर्भ सामावून घेत आपला अवकाश विस्तृत करत जाते. डॉ० वाकणकरांच्या प्रौढावस्थेतील प्रणयाचा प्रसंग जीवनमूल्यांच्या

लढ्याच्या या कथेला स्त्री-पुरुष प्रेम-आकर्षणाच्या आदिम प्रेरणेचा नाजूक धागा जोडतो. डॉ० वाकणकरांची डायरी व त्यांना होणारे भास कुशल कथातंत्राचे अविभाज्य अंग म्हणून येतात. प्रतिमा-प्रतीकं व आलंकारिक भाषेच्या लालित्याचा फारसा आधार न घेता विवेचन, विवरण, निवेदन व भाष्य करणाऱ्या व्यावहारिक भाषेलाच साहित्यिक भाषेचा बाज देण्याची प्रातिभ शक्ती कथेच्या भाषेचं वैशिष्ट्य आहे. यात आवेग-आवेश कमी; पण परिणामकारकता मात्र खूप आहे.

श्री० उदय प्रकाश यांच्यासारख्या सिद्धहस्त लेखकाची वरवर साधी-सरळ वाटणारी भाषा अनुवादाच्या दृष्टीने किती आव्हानात्मक आहे, याचा प्रत्यय हा मराठी अनुवाद वाचताना सतत येत राहतो. याचे मुख्य कारण म्हणजे अनुवाद शब्दानुवादावर भर देणारा आहे.

सफल अनुवादामध्ये शब्दनिष्ठता (मूळ आशय-शैलीशी एकनिष्ठता) आणि परिणामकारकता (सर्जनात्मक स्वातंत्र्य) यांचा सुरेख मेळ साधण्याचा प्रयत्न केला जातो. म्हणजेच मूळ कृतीतील भाषाशैली लक्ष्य भाषेत जशीच्या तशी जपल्यास त्यातील भावस्थिती (मूड) परिणामकारकरित्या पोहोचत नसेल तर प्रभावसाम्यासाठी थोडे सर्जनात्मक बदल करण्याची सवलत घेतली जाते. तसंच ललित कृतीशील अर्थ शब्दांच्या कोशातील अर्थातून पूर्णपणे व्यक्त होतीलच असं नसतं. शब्दांचा ध्वन्यर्थ, संपूर्ण संदर्भ, सामाजिक-सांस्कृतिक परंपरा, भाषिक रूढी व त्या-त्या वाङ्मय- प्रकाराच्या भाषेची विकास-परंपरा या सर्वांमधून व्यक्त होत असतो. अनुवादकाला मूळ कृतीच्या आकलनाबरोबरच या अशा सर्व गोष्टींचा आवाका असणे अपेक्षित असते.

या अनुवादकाने मूळ कथेच्या आशयाशी इमान राखण्याचा प्रयत्न केला आहे. शिवाय 'अकेला'साठी 'एकटं-एकटं', 'बरबाद'साठी 'वाया गेलेला', 'कुरतुतों से बाज आएँ'साठी 'थेर थांबवा' असे शब्दांच्या पातळीवर व त्याचबरोबर वाक्यरचनेतही काही अनुकूल बदल केलेले आहेत. पण एकूण अनुवादात त्यांचे प्रमाण खूपच कमी आहे. उलटपक्षी आशयानुरूप आलेली हिंदीची शब्दकळा व भाषाशैली जशीच्या तशी मराठीत उतरवण्याचा आग्रह धरण्यामुळे मराठीचा बाज व परिणाम दोन्हींची हानी झाल्याची स्थळं मात्र खूपच जास्त आहेत.

या दृष्टीने अनुवादातील काही उदाहरणे पाहता येतील.

● **शब्दयोजना, शब्दांची निवड**

○ गहरा पश्चात्ताप = खोल पश्चात्ताप

○ गहरा असर = खोल परिणाम

○ रजई में घुसे थे = रजईत घुसले होते

○ साँस पाने के लिए तडप उठते = श्वास पकडण्यासाठी धडपडत होते

○ भूमिकाओं से भरा हुआ नाटक = भूमिकांनी भरलेलं नाटक
○ चेहरा जो नीचे की ओर पतला हो गया था = खाली पातळ होत गेलेला चेहरा
○ सनसनता हुआ क्षण = सणसणता क्षण
○ अपराध वहाँ नही के बराबर थे = गुन्ह्यांचं प्रमाण जवळजवळ नाहीच्या बरोबर
○ बचपन से सरोबार = बालिशपणानं गच... इ०
○ सह-प्रयोग - विशिष्ट प्रयोग

| अनुवादातील शब्द | अपेक्षित शब्द |
|---|---|
| टोक **काढलेली** पेन्सिल | टोक **केलेली** पेन्सिल |
| धन-संपत्ति | धन-**दौलत** |
| सूर्य जळत होता | तळपत होता, आग ओकत होता |
| **आकाशात** गोळीबार | **हवेत** गोळीबार |
| आजारी **होणे** | आजारी **पडणे** |
| चिमणी **पेटलेली** होती | दिवा **जळत** होता |
| **विस्तृत** जांघा | **पुष्ट** मांड्या |
| **भरीव** शरीर | **भरदार** शरीर |
| **रंगीबेरंगी** मुनष्यांच्या सर्व जाती | विविध **वर्णांच्या** जाती |
| ग्रीसने हात काळे **पडले** | हात काळे **झाले** |
| **लाजऱ्या** मांजरीसारखे | **बुजऱ्या** मांजरी सारखे |

● **प्रत्ययादि शब्दांचा वापर**

| | |
|---|---|
| पंतप्रधान जनते**साठी** बोलतील | अनिश्चित**तेला** जाणतो. |
| अनैतिक **प्रकारे** | नीट**पणे** माहीत होते. |
| इतक्या **मध्येच** संतुष्ट | योग्य **तऱ्हेने** नाचणे |
| लाठी व लेझिम **सकट** निघाले. | आपल्या जखमा **घेऊन** मुले येत |
| संक्षिप्त **मात्रेत**.. इत्यादि. | |

अशा भाषेचा वाचकावर काय परिणाम होत असेल हे वेगळे सांगायला नको. असं म्हटलं जातं की विभक्ति-प्रत्यय, पदरचना आणि विशिष्ट प्रयोग हे त्या-त्या भाषेला स्वत:ची वेगळी ओळख देत असतात म्हणून अनुवादामध्ये मूळ अर्थ सांभाळत असताना लक्ष्य भाषेची ही ढब सांभाळणे स्वाभाविकता व परिणाम या दोन्ही दृष्टींनी महत्त्वाचे असते.

हीच गोष्ट क्रियापदांच्या रूपाबाबतही आहे. ही काही उदाहरणे पाहा.

● देख रही थी = बघितला होता (क्रियेची पूर्णता-अपूर्णता बोध)

● धक्का लगवाया = धक्का मारवला. (मराठीत असे प्रेरणार्थक रूप नाही)

• प्रश्न लिख छोडा था = प्रश्न विचारला होता (अर्थात बदल)

• पुस्तक उठाई और उसे पढते रहे = पुस्तक उचललं आणि ते वाचत राहिले. (पुस्तक घेऊन वाचत बसले - स्वाभाविक रूप)

• इस मामले की प्रायरिटी देकर देखूँगा = ही गोष्ट प्रायरिटी देऊन बघू. (बघूच्या ऐवजी बघेन पाहिजे होते.)

• या शिवाय : नेलं - नेण्यात आलं
घेतलं - घेतलं होतं
जात होते - जाऊ लागले होते
निरोप पाठवला - पाठवला गेला
} ही अर्थाची छटा बदलणारी रूपं आहेत.

• म्हणणे, सांगणे, बोलणे,
बघणे, पाहणे, दिसणे, न्याहाळणे
} या क्रियापदांच्या अर्थामध्ये सूक्ष्म फरक आहे

(उदा० अंघोळ करताना डॉ० वाकणकरांनी ज्योत्स्ना वाकणकरांचं शरीर बघितलं)

वाक्यातील कार्याच्या काळाचा, स्थितींचा, पूर्ण-अपूर्णतेचा, व त्या अनुषंगाने अर्थाचा बोध क्रियापदाच्या रूपांमुळे होत असतो. म्हणून त्यांचा वापर विचारपूर्वक करावा लागतो. अनुवादात या बाबतीत दोन भाषांमधील साम्य-भेदांचाही विचार करावा लागतो. या अनुवादात याबाबत फारसा गंभीरपणा दिसून येत नाही.

हिंदी शब्दांचा बेधडक उपयोगही अनुवादात केला गेला आहे. 'निरंतर (सतत) काम करत राहिले', 'तेज धार असलेला चाकू', 'अर्जित केल्या', 'टाक्या बेकार (निकामी) पडून होत्या', सुरक्षित (राखीव) मतदार संघ, जीपा दौडू लागल्या, घुमवून आणू, देवाला मुर्गी चढवली, सरकार कटिबद्ध होतं, वासनेचा तेज (तीव्र) आवेग, भारतीय खाना (जेवण), बातचीत केली, लौंड्यांना ठोकून काढा, छाती पिटत (बडवत) रडत होती. बेकायदा (बेकायदेशीर), सणकी, लालची (लोभी), घपला (घोटाळा), इलाका, आम समज, सन्नाटा (सामसूम), खतरनाक (घातक) अनुमती (परवानगी) राजकीय दल (पक्ष) जाने-माने (प्रसिद्ध) जिल्हाधीश (जिल्हाधिकारी) इ०

विशिष्ट उद्देशाने वापरलेले, लक्ष्यभाषेत पर्यायी शब्द नसल्यामुळे वापरलेले वा स्वभाषीकरण केलेल्या दुसऱ्या भाषेतील शब्द व्यवहारात किंवा साहित्यातही स्वीकारले जाऊ शकतात. पण अचूक पर्यायी शब्द असतानाही अकारण व वारंवार येणारे असे शब्द चालताना ठेच लागावी तसे वाचनात अडथळा आणतात.

वाक्यांश व वाक्यरचनेत शब्दानुवादाच्या आहारी गेल्यामुळे रसभंग करणारी वाक्यं तर खूपच आहेत. काही वाक्ये अशी :

''आवेगाने भरलेल्या अनुभवांचे ढीग''

''नैसर्गिक व स्वाभाविक मुलांना भेटण्याची विधि''

''बालपणाला स्थायी स्वरूपाचे अनुभव जोडले गेले.''

''फुफ्फुसात नवी ताजी हवा भरली जाईल.''

''पंतप्रधान भय आणि अनिर्णय यांच्या घेऱ्यात थरथर कापत होते.''

''ताज्या शिथिलपणाने भरलेल्या मुक्त पर्यावरणात गाणी तरंगू लागली.''

जवळजवळ प्रत्येक पानावर अशी बहुसंख्य वाक्यं येतात. त्यांच्याबरोबर कधी-कधी मध्येच येणारी संदिग्ध वाक्यं (''एका आठवड्याचा काळ अजून सुरू होता.'', ''आता आकाशात अवेळीच ढग नव्हते.'' ''ही प्रचंड खळबळ होती'' इ०) वाचकाचा गोंधळ उडवून टाकतात.

अनवधानाने काही चुकाही ('असंदिग्ध'साठी, 'संदिग्ध', 'फर्जीमस्टर'साठी, 'नाममल मस्टर', 'जो हो पाएगा-करूँगा'साठी 'जे हवं ते करायला' इ०) राहून गेल्या आहेत.

पण यशापयशाच्या लौकिक मर्यादांच्या पलीकडे जाऊन माणसाच्या जगण्याचा खरा अर्थ शोधू पाहणारी व त्या वाटेवर चालत राहण्याचं बळ देणारी ही महत्त्वाची कथा मराठी वाचकांपर्यंत पोहोचवण्याचं काम या अनुवादानं केलं आहे. ■

**भाषा आणि प्रतीक-व्यवस्था**

जसजशी भाषा ही (गरजांनुसार) विकसित होत जाते, तसतशी ती चिन्हांकित किंवा प्रतीकात्मक करण्याची गरज भासते. कारण, त्यामुळेच भाषा अधिकाधिक आणि नवनव्या संकल्पनांचा समावेश करून घेण्यास पात्र होत जाते. थोडक्यात, प्रत्यक्षपणे भाषाच समृद्ध होत जाते. ही प्रतीकात्मकता (Symbolization) जशी भाषेत तशीच ती तर्कविश्वातही असते; कलाविश्वातही ती प्रकटते. किंबहुना, वेगवेगळे अर्थ दर्शविण्यासाठी प्रतीकांचा - प्रतीकचिन्हांचा (symbols) वापर करणे हे मानवाचे व्यवच्छेदक लक्षण मानले जाते. त्यांचा वापर करून माणसाने आपली संवाद-भाषाही समृद्ध केली आणि गणित-विज्ञानासारख्या क्षेत्रांतही मोठी मजल मारली. अलीकडे विकासक मानसशास्त्रात (Developmental Psychology) या प्रतीक-व्यवस्थेचा अभ्यास केला जातो. आकलनविषयक विकासक मानसशास्त्रात (Cognitive Developmental Psychology) तर या प्रतीकव्यवस्थेचे स्वरूप उलगडण्यापासून ते शिक्षणात यावर प्रभुत्व प्राप्त करण्याचे मार्ग कोणते यावर अभ्यास केला जात आहे.

- डॉ० रमेश पानसे

# गुजर आणि गुजरी

ब्रह्मानंद देशपांडे

भाषा आणि जीवन, उन्हाळा २०११ (वर्ष २९, अंक २) मिळाला. त्याविषयी सुचलेले विचार पुढे देत आहे.

(१) गुजर

(अ) पृ० ७३वर गुजर या शब्दाविषयी चर्चा आहे. गोचरपासून गुचर-गुजर अशी व्युत्पत्ती नोंदविली आहे. पण गोचर (गाई चारणारा!) या शब्दाचा वापर दाखवता आला पाहिजे असे वाटते. शिवाय गोचर म्हणजे गाई चारणारा की गोचर म्हणजे गुरचराईचे रान असा प्रश्न आहेच. पंचांगात गोचर गुरुचे फल असते. गोचर म्हणजे गुरचराईची जागा असा अर्थ मैथिली भाषेत आहे. (फणीश्वरनाथ 'रेणु', परती परिकथा, पृ० २१०) मग गोचर-गुजर म्हणजे स्थानविशेष की पुरुषविशेष? गोचर म्हणजे पशुपक्ष्यांचे अन्न शोधण्याचे ठरीव क्षेत्र असा अर्थ जातककथांमधून सापडतो. [चिं०वि० जोशी यांचा 'जातकांतील निवडक गोष्टी' (भाग पहिला) हा ग्रंथ हाताशी नसल्यामुळे संदर्भ देता येत नाही.]

गोचर-गुचर-गुजर या व्युत्पत्तीच्या समर्थकांना गुचर वा गुजर म्हणजे गाई चरावयास नेणारा असा वापर प्राचीन वा अर्वाचीन मराठी साहित्यातून काढून दाखवता आला पाहिजे.

(ब) गुजराती पुरुष

महानुभाव पंथ प्रवर्तक श्रीचक्रधरस्वामी हे गुजराथी लाड सामवेदी ब्राह्मण होते. यादव सम्राट महादेवराय हा त्यांच्या दर्शनासाठी सिन्नर (जिल्हा नाशिक) येथे आला. त्याने आपला सेवक पाल्हा डांगिया याला पाठवले. स्वामी भिल्लममठात होते. हे मंदीर महादेवरायाचा पूर्वज भिल्लम (द्वितीय) याने बांधले असावे. तेव्हा स्वामींनी -

गुजरु वेश घेतला : गुजर दौंडी घेतली (पूर्वार्ध, लीळा क्र० २३७)

श्रीचक्रधरस्वामींचे वास्तव्य पैठण (जिल्हा औरंगाबाद) येथे चीचाएच्या देवळात होते.

तंव तेथ गुजरु एकु आला : -- तयासी गुजरी भाषा गोष्टि केली : तो थोरु सुखीया जाला : (उत्तरार्ध लीळा क्र० ४६४)

(क) गुजर - सुंदर पुरुष

श्रीचक्रधरस्वामींचे वास्तव्य पैठण येथे ढोरेश्वर मठात होते. त्यांच्यासाठी लाडू करण्यासाठी महदाइसा सोजी कांडत होत्या. कांडतांना त्या ओव्या गात होत्या. त्या





अनुक्रमणिका

अशा

गोमतीए तीरी : नीळेया गुदराः
राजेया गुजरा : श्रीकृष्णराया ॥१॥
नीळा गुढरु : राजा गुजरुः
माणिकीं मंडपी : श्रीचक्रधरू ॥२॥

येथे गुजर शब्दाचा अर्थ सुंदरपुरुष असा घ्यावा असे वाटते. गुजर म्हणजे गुजरातचा निवासी असाही अर्थ घेतला जातो.

(ड) गुजरी

गुजरी या शब्दाविषयी मात्र वेगळा विचार करावा लागेल. अनेक लहानमोठ्या गावात सायंकाळी मोकळ्या जागेत बाजार भरतो. त्यासाठी महानुभाव साहित्यात 'गोदरी' असा शब्द आला आहे.

श्रीचक्रधरस्वामींचे वास्तव्य बीड येथे होते. रामदेव दादोस (देव) आणि नागदेव भट बीड येथे आले.

वीळिचा हाटवटियेसि आले. तंव वीळिचाची गोदरी भरली देखिली : दोन्ही सुटकोनी दिवे लागले असति : बरवी पाने : पोफळे : केळे : नारीएळे :

(पूर्वार्ध, लीळा क्र० ३०२, शिवाय पूर्वार्ध, लीळा क्र० ३, १५, १६६, ५८५)

या शब्दाचा 'उकिरडा' असा अर्थ दिला गेला आहे. तो वरील लीळेच्या संदर्भात उघडपणे चुकीचा आहे. लीळा क्र० १५ मध्ये तर बीदी-गोदरीया असा जोडशब्द येतो.

स्थानपोथीतही गोदरी शब्द येतो. तो असा :

लोणारखांडीचेया दारवठ्यपासौनि सैग गोदरी पूर्वपसीम... (स्थानपोथी पृ० १६)

ऋद्धिपूर येथे उपासनी यांच्या घराजवळ (गोविंदप्रभूचरित्र, लीळा क्र० ५८) गोदरी होती. तेथील बाजारास गोदरी म्हणत. (तत्रैव, लीळा क्र० १२२). वा०ना० देशपांडे संपादित 'महदंबेचे धवळे' या ग्रंथात मातृकास्वयंवर काव्य आहे. त्यातही गोदरी (ओवी क्र० ३) आहे. याचेच रूप गुजरी असे होते. सदानंद देशमुख यांच्या 'तहान' या कादंबरीत 'भजे करू कां' 'अंडे आन नं गुजरीतून' असा संवाद येतो. (पृ० ३७). हरिश्चंद्र बोरकर यांच्या *'झाडीबोली'* आणि रमेश सूर्यवंशी यांच्या *'अहिराणी शब्दकोश'* यांतही हाच अर्थ आहे. (हे संदर्भ आमचे परममित्र प्रा० रावसाहेब काळे यांनी पुरविले. त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच.) कशेळी (जि०रत्नागिरी), फुलंबरी (जि०औरंगाबाद), साखरखेर्डा (जि०बुलढाणा), परतुर (जि०जालना), वाशिम (जि०वाशिम), अंबाजोगाई (जि०बीड), वाळूज, कन्नड (जि०औरंगाबाद) येथील गुजरी मी पाहिल्या आहेत. रिसोड (जि०वाशिम) हे माझे जन्मगाव. येथील गुजरीतच शिवसेना प्रमुखांची सभा झाली. गुजरी भागात बोलल्या जाणाऱ्या भाषेला अर्धवट गुजरी म्हणतात.

नांदेड जिल्ह्यातील कंधार येथे राष्ट्रकूट काळातील प्रदीर्घ लेख आहे. त्यात गुर्जर आपणक असा शब्द येतो. (Epigraphia Indica, vol. xxxv, pp. 105-114. काळ : अंदाजे ९३९-४० इ०स०) हा गुजरीचा प्राचीनतम उल्लेख समजावा काय?

गुजरी आणि गुजर (व्यापारी, गुजर जातीचा पुरुष अथवा गुजरात प्रांतीचा पुरुष) यांच्यात काय नाते असावे?

**(इ) गुजरी - सुंदर स्त्री**

सुंदर स्त्री या अर्थाने गुजरी हा शब्द अनेक लोकगीतांत - विशेषत: हिंदी प्रदेशातील लोकगीतांत येतो. येथे गोजिरी या शब्दाची सहजच आठवण होते. ■

**प्रतिसाद - २**

# घररिघे शब्द

**ब्रह्मानंद देशपांडे**

'भाषा आणि जीवन' उन्हाळा २०११ अंकात शरदिनी मोहिते यांचा दीर्घ आणि सुंदर 'घररिघे शब्द' हा लेख आहे. (पृ० ४८-६१)

(अ) आणखी दोन घररिघे शब्द नोंदवतो

बालंट - वारंट टाच - ॲटॅचमेंट

(ब) गुड्ड

गुड्ड म्हणजे शिष्य, चेला, हे योग्यच. पण गुड्ड म्हणजे पर्वत अथवा टेकडी असाही अर्थ आहे. देवरगुड्ड नामक गाव पुणे-बंगलोर मार्गावर असून तेथे टेकडीवर मैलारदेवाचे मंदिर आहे. कल्लुरगुड्ड नामक गाव शिमोगा परगण्यात असून तेथे गंगवंशीय राजाचा दीर्घ शिलालेख आहे. (जैन शिलालेख संग्रह, द्वितीयो भाग:, क्र० २७७, पृ० ४०८)

**(क) टरबुज**

टरबुज हे तरबुस. तर = हिरवे (तरकारी = भाजी) बुस = दिसणारे. खरबुस. (खर = गाढवासारखे दिसणारे)

**(ड) पायरी**

दिवे आगर (ता० श्रीवर्धन, जि० रायगड) येथे १९९७मध्ये खणताना सुवर्णगणेश मूर्ती सापडली. तिच्या कानात पायरी आंबा आहे. मूर्ती प्राचीन म्हटली तर पायरी पोर्तुगीज पूर्व ठरते. तसे नसेल सुवर्ण गणेश पोर्तुगीज आगमनानंतरचा ठरतो. दिवे आगरचे स्थानिक नागरिक गणेशमूर्ती शिलाहारकालीन मानतात.

संदर्भ
(१) म्हाइंभट., *लीळाचरित्र,* संपादक : वि० भि० कोलते. आवृत्ती तिसरी, विश्वशांती प्रकाशन, औरंगाबाद १९९७
(२) म्हाइंभट., *गोविंदप्रभुचरित्र,* संपादक : ब्रह्मानंद देशपांडे. कैलास प्रकाशन, औरंगाबाद, १९९९.
(३) *स्थानपोथी.* संपादक : वि०भि० कोलते. अरुण प्रकाशन, मलकापुर, द्वितीय आवृत्ती, १९७६.
(४) *जैन शिलालेख संग्रह.* संपादक : विजयमूर्ति. माणिकचंद्र दिगंबर जैन ग्रंथमाला. १९५२.
(५) *महदंबा - आद्य मराठी कवयित्री.* वा०ना० देशपांडे. कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे, द्वितीय आवृत्ती, १९५६. ■

**प्रतिसाद - ३**

# तिरपा ठसा की अवतरण चिन्हे?

**- सत्त्वशीला सामंत**

पावसाळा २०११ या अंकात एक वेगळी मुद्रणसरणी अवलंबिल्याचे लक्षात आले. आजवर विशेषनामांचा उल्लेख करताना, एकेरी अवतरण चिन्हांचा वापर करण्याची प्रथा होती. पण अलीकडे इंग्रजीचे अनुकरण करून अनेक नियतकालिकांनी विशेषनामे तिरक्या ठश्यात छापण्यास सुरुवात केली. आपल्या नियतकालिकानेही ती पद्धती सुरू केल्याचे जाणवले.

या पद्धतीबाबत मी माझा एक आक्षेप नोंदवू इच्छिते. इंग्रजीमध्ये कोणत्याही नामाला - विशेषतः विशेषनामापुढे प्रत्यय वा शब्दयोगी अव्यय आले तरी मूळ शब्दाला ते चिकटून लिहिले जात नाही. विशेषनाम हे स्वतंत्र राहते व त्यामुळे तिरक्या ठश्यातील विशेषनाम ठळकपणे लक्षात येते. शिवाय, इंग्रजी शब्दांना शिरोरेखा नसते. याउलट, मराठीत प्रत्येक शब्दाला शिरोरेखा असते व प्रत्ययादी अव्यये मूळ शब्दाला चिकटून येतात. या कारणाने एका सरळ शिरोरेखेखाली काही अक्षरे तिरकी व काही अक्षरे सरळ (उदा० ख्रिस्तपुराणातून) हा प्रकार डोळ्यांना खटकतो. नमुन्यादाखल या अंकातील पृ० ३४वर 'ख्रिस्तपुराणा'त आणि *ख्रिस्तपुराणातून* असे दोन शब्द वेगवेगळ्या पद्धतींनी छापले आहेत. यापैकी मला पहिला प्रकार सुबक वाटतो. आपण या मुद्द्यावर संपादक-मंडळात चर्चा करावी व आपणांस माझा मुद्दा पटला तर तसा निर्णय घ्यावा. नवीन चांगल्या गोष्टींबाबत इंग्रजीचे अनुकरण जरूर करावे, पण अंधानुकरण नसावे. ■

**प्रतिसाद - ४**

# तिन्ही सांजा

**- हेमा क्षीरसागर**

**संदर्भ :** भाषा आणि जीवन पावसाळा २०१०/२८.३ सुशांत शंकर देवळेकर पृ०७५

महाराष्ट्र कर्नाटकाच्या सीमारेषेवरील बहुचर्चित 'बेळगाव' या गावातला एक अनुभव. कानडी लोकांच्या बोलण्यात 'मूरु संजी' असा शब्दप्रयोग रूढ आहे. 'मूरु' म्हणजे 'तीन' आणि 'संजी' म्हणजे 'सांज' - संध्याकाळ. हा शब्दप्रयोग 'त्रिकालसंध्या' या कल्पनेशी मिळताजुळता आहे. पण त्याचा वापर मात्र 'तिसरी संध्या' (मावळतीच्या वेळची) असा रूढ आहे.

'किरकिरती रातकिडे, झाल्या तिन्ही सांजा' याही ठिकाणी 'रात्रीच्या आधीची संध्याकाळ' असाच अर्थ अभिप्रेत आहे. कारण 'अजुनी कसे येती ना, परधान्या राजा' अशी आधीची ओळ असून दिवे लागणीची, गुरे परतण्याची वेळ आहे. ■

**प्रतिसाद - ५**

# मुखपृष्ठावरील - चित्राचा/चे अर्थ

**- आशुतोष पुरंदरे**

कव्हरचे चित्र पाहिले. चंद्रमोहन यांची चित्रे मी नेहमीच आवडीने पाहतो आणि खूप त्रास होतो; कारण मीही चित्रे काढतो आणि पुस्तकाची कव्हर्स तयार करतो; पण चंद्रमोहन यांच्या चित्रांच्या कल्पना एव्हढ्या भन्नाट असतात की असे एक जरी कव्हर मला सुचले (काढणे या जन्मात शक्य नाही!) तरी मी स्वत:ला धन्य समजेन. असो.

मला वाटते ह्या कव्हरमधून सध्याची अभिजात मराठी साहित्याची उपेक्षा, अडचणी, संकटे दाखवणारा महाविक्राळ जबडा आणि त्यातून मुक्तीचा संदेश घेऊन निघालेला आशेचा पक्षी म्हणजे हे 'प्रकाशन' असे तर चंद्रमोहनना सुचवायचे नसेल?

■

# मराठी अभ्यास परिषद

## सोळाव्या वार्षिक सभेचे इतिवृत्त

मराठी अभ्यास परिषदेची, २०१०-११ या वर्षाची वार्षिक सर्वसाधारण सभा रविवार, दि. १७ जुलै २०११ रोजी सायंकाळी ठीक ५-३० वा. संस्थेचे अध्यक्ष प्रा० प्र०ना० परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली घेण्यात आली. शिक्षक भवन, नवी पेठ, पुणे येथील सभागृह क्र० २ अ येथे झालेल्या या सभेला आठ जण उपस्थित होते. गणसंख्येअभावी सभा १५ मिनिटांनी स्थगित होऊन त्याच ठिकाणी सुरू झाली.

सभेच्या सुरुवातीला, २०१०-११ या आर्थिक वर्षात कालवश झालेल्या प्राचार्य बाळ गाडगीळ, कविवर्य नारायण सुर्वे, प्राचार्य शिवाजीराव भोसले यांच्याबरोबरच २०११-१२ या वर्षात कालवश झालेले एम०एफ० हुसेन, पं० भीमसेन जोशी, साधनाताई आमटे, जगदीश खेबूडकर, शाहीर योगेश, प्रा० कमल देसाई आदी मान्यवरांना आणि श्रीमती वसुधा माने, डॉ० सुभाष भेंडे, प्रा० ग०प्र० प्रधान, डॉ० स०ह० देशपांडे या संस्थेच्या आजीव सभासदांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

त्यानंतर मागील वर्षाच्या म्हणजे २००९-१० या आर्थिक वर्षाच्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त कार्यवाह प्रा० आनन्द काटीकर यांनी वाचून दाखवले. या इतिवृत्ताला मान्यता देण्याचा प्रस्ताव डॉ० नीलिमा गुंडी यांनी मांडला; तर डॉ० अरविंद नवरे यांनी त्याला अनुमोदन दिले.

त्याचप्रमाणे २०१०-११ या वर्षाचे कार्यवृत्तही प्रा० आनन्द काटीकर यांनी वाचून दाखवले. त्याला सूचक म्हणून विजय पाध्ये यांनी तर अनुमोदक म्हणून डॉ० मनोहर राईलकर यांनी मान्यता दिली.

संस्थेच्या कोषाध्यक्षा विजया चौधरी यांनी लेखापरीक्षकाने तपासलेले २०१०-११ या आर्थिक वर्षाचे जमा-खर्चपत्रक आणि ताळेबंद संमत करण्याचा आणि २०११-१२ या आर्थिक वर्षाचा अर्थसंकल्प मांडून तो संमत करण्याचा प्रस्ताव मांडला आणि त्याला अनुक्रमे डॉ० अरविंद नवरे आणि डॉ० प्रमोद तलगेरी यांनी अनुमोदन दिले.

या ताळेबंदात प्रवास, दूरभाष म्हणून काहीही खर्च कसा दिसत नाही? असा प्रश्न डॉ० अरविंद नवरे यांनी उपस्थित केला. त्यावर संस्थेचे पदाधिकारी असा खर्च स्वतःच्या खिशातून करतात, असे उत्तर कोषाध्यक्षांनी दिले. याचाच अर्थ खर्च होतो; पण तो दाखवला जात नाही असा होतो. त्यामुळे हा खर्च हिशोबात दाखवला जावा आणि

पदाधिकारी तो स्वतःच्या खिशातून करत असतील तर पदाधिकाऱ्यांनी देणगी दिले असे जमा बाजूस दाखवले जावे; म्हणजे संस्था चालवण्यासाठी होणारा खर्च पूर्णपणे कळू शकेल, अशी सूचना डॉ० अरविंद नवरे यांनी केली. त्याचप्रमाणे आयकर नियमातील संभाव्य बाजू लक्षात घेता संस्थेच्या कामकाजाकरिता मिळालेल्या देणगीचा समावेश राखीव अथवा कायम निधी या शीर्षकाखाली करावा अशीही सूचना डॉ० नवरे यांनी केली.

२०११-१२ या आर्थिक वर्षाकरिता लेखापरीक्षणासाठी सध्याचे लेखापरीक्षक श्री० ए०जे० दिघे आणि कंपनी आणि कायदेविषयक सल्लागार म्हणून ॲड० पराग देशपांडे यांची नेमणूक कायम करण्याचा प्रस्ताव आनन्द काटीकर यांनी मांडला. या प्रस्तावाला विजय पाध्ये यांनी अनुमोदन दिले. त्यांचे मानधन ठरवण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला देण्याचा प्रस्ताव सभेने एकमताने मान्य केला.

यानंतर संस्थेच्या घटनेत करावयाच्या बदलांची चर्चा झाली.

● **कलम ५ :** सभासदांचे प्रकार : नवीन उपकलम ५ ए : पृष्ठ ५ :

विश्वस्तांची नेमणूक : संस्थेचे कार्यकारी मंडळ एकमताने कमाल ३ विश्वस्तांची नेमणूक करेल.

विश्वस्तांचे अधिकार आणि कर्तव्ये नेमकी काय असतील? असे विश्वस्त नेमण्याचे फायदे काय होतील? असे प्रश्न उपस्थित होऊन सविस्तर चर्चा झाली. सरतेशेवटी या कलमाविषयी कायदेशीर सल्ला* घेण्याचे ठरले.

*त्यानुसार कायदेशीर सल्ला घेतला गेला. या सल्ल्यानुसार आपली संस्था ज्या कलमांच्या आधारे धर्मादाय संस्था म्हणून मान्यता मिळालेली आहे, त्यानुसार संस्थेचे कार्यकारी मंडळ हेच विश्वस्त मंडळ नेमण्याची आवश्यकता नाही आणि नेमणे शक्यही ठरणार नाही.

● **कलम १० :** कार्यकारी मंडळाची रचना : उपकलम (अ) : पृष्ठ ६ :

कार्यकारी मंडळातील सभासदांमध्ये पुण्यातील आणि पुण्याबाहेरील असा कोणताही भेद न करता सरसकट ९ सभासदांचा अंतर्भाव करण्यात यावा.

यावर झालेल्या चर्चेमध्ये वेगवेगळ्या (पुणे वगळता अन्य) ठिकाणच्या सर्व सभासदांचे प्रतिनिधित्व राखण्याचा विचार करावा. कार्यकारी मंडळातील सभासदांची संख्या आवश्यकतेप्रमाणे वाढवावी अशा सूचना उपस्थितांनी केल्या.

● **कलम ११ :** संस्थेचे पदाधिकारी व त्यांची कार्ये : उपकलम (५) : पृष्ठ ७ :

सहकार्यवाह एकाऐवजी दोन नेमण्यात यावेत. एकाकडे अंकांचे वितरण आणि दुसऱ्याकडे कार्यक्रमांचे नियोजन अशा जबाबदाऱ्यांचे वाटप केले जावे.

या कलमाला सर्वांनी मान्यता दिली, मात्र घटनेत जबाबदाऱ्यांचे वाटप न दाखवता

कार्यकारी मंडळाच्या बैठकीत हे कामांचे वाटप करण्यात यावे, अशी दुरुस्ती डॉ० राईलकर यांनी सुचविली आणि ती सर्वांनी मान्य केली.

माननीय अध्यक्षांच्या परवानगीने आयत्या वेळचे विषय घेण्यात आले. त्यामध्ये डॉ० अरविंद नवरे यांनी, पुढील वर्षी संस्थेला ३० वर्षे पूर्ण होत आहेत या निमित्ताने, विविध ठिकाणी - मुंबई, ठाणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर इ० ठिकाणी संस्थेच्या शाखा उघडाव्यात, विशेष कार्यक्रम आयोजित करावे, **भाषा आणि जीवन**चा एखादा विशेषांक काढावा अशा सूचना केल्या. यासाठी वैयक्तिक रु. १,०००/- ची देणगीही त्यांनी जाहीर केली. ■

**-आनन्द काटीकर**

# युनिकोड कार्यशाळा

**प्रा० सोनाली गुजर**

'मराठी अभ्यास परिषद' आणि 'जे०व्ही०एम० मेहता विद्यालय', ऐरोली, नवी मुंबई यांच्या संयुक्त विद्यमाने 'युनिकोडच्या साह्याने मराठीचा संगणकावर वापर' या विषयावर शनिवार, दि/ १० सप्टेंबर २०११ रोजी एक कार्यशाळा आयोजित करण्यात आली.

या कार्यशाळेत मेहता महाविद्यालयाचे विद्यार्थी, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी असे जवळपास सत्तर जण सहभागी होते.

महाविद्यालयाच्या विभाग-प्रमुख प्रा० सोनाली गुजर यांनी प्रास्तविक केले. प्राचार्या डॉ० भाग्यश्री दाबके यांनी उपस्थितांचे व मान्यवरांचे स्वागत केले. कनिष्ठ महाविद्यालयाच्या मराठी विषयाच्या शिक्षिका मंगल कातकर यांनी मान्यवरांचा परिचय करून दिला.

मराठी अभ्यास परिषद, पुणे या संस्थेचे कार्यवाह या नात्याने प्रा० आनन्द काटीकर (अधिव्याख्याता, मराठी विभाग, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे) यांनी 'परिषदेची भूमिका व कार्य' यांची माहिती दिली. त्यांनी 'युनिकोड'चा थोडक्यात परिचय करून दिला.

कार्यशालेच्या पूर्वार्धात श्री० सुशान्त देवळेकर (कनिष्ठ संशोधन साहाय्यक, राज्य मराठी विकास संस्था) यांनी संगणक, संगणकाची भाषा, संगणकावर मराठीचा वापर करण्याचे अन्य पर्याय आणि 'युनिकोड'ची आवश्यकता व उपयोग यांविषयी तपशीलवार माहिती दिली. उत्तरार्धात उपस्थितांना युनिकोडचा वापर कसा करावा याचे प्रात्यक्षिक देण्यात आले. सहभागींना प्रत्यक्ष संगणकावर प्रात्यक्षिक करता आल्याने 'युनिकोड'चा वापर त्यांना चांगल्या तऱ्हेने लक्षात येण्यास मदत झाली. सहभागींनी उत्स्फूर्त प्रतिसाद देऊन कार्यशाळा यशस्वी केली.

तृतीय वर्ष वाणिज्य शाखेची विद्यार्थिनी कु० ज्योती शिंदे हिने आभारप्रदर्शन केले. ■

## लेखक-परिचय

- **खोपकर, अरुण** : शास्त्रशाखेतील पदवी. श्री० मणी कौल यांच्या *'आषाढ का एक दिन'* या चित्रपटात कालिदासाची मुख्य भूमिका. १९७४ साली फिल्म इन्स्टिट्यूट या संस्थेतला दिग्दर्शनाचा विशेष अभ्यास पूर्ण केला. त्यानंतर सुमारे चाळीस लघुपटांची निर्मिती. त्याबद्दल आतापर्यंत सुमारे पंधरा राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय पुरस्कार. त्यात सर्वश्रेष्ठ नॉन-फिचर चित्रपट आणि त्याचे दिग्दर्शन याबद्दलचे तीनदा सुवर्णपदक. त्यांचे लघुपट हे काव्य, नृत्य, संगीत, चित्रकला आणि स्थापत्यकला ह्यांचा सिनेमाद्वारे एक नवीन प्रकारे अनुभव देतात. *गुरुदत्त : तीन अंकी शोकांतिका* या पुस्तकाला सिनेमावरील सर्वोत्तम पुस्तकाचा राष्ट्रीय पुरस्कार. ते होमी भाभा फेलो होते. अनेक राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय नियतकालिकांत सिनेमाच्या मूलभूत प्रश्नांवर लेखन. विविध राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय संस्थांमध्ये अध्यापन. मराठी, इंग्रजी, हिंदी, बंगाली, संस्कृत ह्या भारतीय भाषांचा आणि फ्रेंच, जर्मन, रशियन, इटालियन व जपानी ह्या विदेशी भाषांचा अभ्यास. सुमारे पंधरा देशांत प्रवास.
- **गुंडी, (डॉ०) नीलिमा** : स०प० कनिष्ठ महाविद्यालयाच्या उपप्राचार्यपदावरून निवृत्त. कविता, ललित व वैचारिक लेख, समीक्षा, संपादन या प्रकारांतील तेरा पुस्तके प्रकाशित, लेखनाबद्दल दोन राज्यपुरस्कार व सहा इतर पुरस्कार. 'लाटांचे मनोगत' हे स्त्रीकाव्याचा चिकित्सक अभ्यास करणारे पुस्तक. *कविता विसाव्या शतकाची* व *भारतीय भाषांतील स्त्रीसाहित्याचा मागोवा* (खंड १ व २) यांच्या संपादनात सहभाग.
टपाल पत्ता : 3, अन्नपूर्णा, 1259 शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे 411 002. स्थिरभाष (020) 2448 6015; ई-पत्ता : nmgundi@gmail.com.
- **देशपांडे, (डॉ०) ब्रह्मानंद** : महामहोपाध्याय, विद्याभूषण, प्राचीन मराठी वाङ्मयाचे व्यासंगी संशोधक. 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' इ० अनेक पुस्तके प्रकाशित.
चलभाष 09923390614
- **परांजपे, (डॉ०) जया** : एम०ए०पीएच०डी०, पुणे विद्यापीठाच्या हिंदी विभागातून प्राध्यापक म्हणून निवृत्त. हिंदी नाटकावर दोन पुस्तके प्रकाशित.
स्थिरभाष (020) 25674915 चलभाष (020) 0955084245
- **बेलवलकर, (डॉ०) सुमन** : पश्चिम विभागीय भाषा केंद्र ( पुणे ) येथे अमराठी विद्यार्थ्यांसाठी मराठीचे अध्यापन, तेथील प्राचार्यपदावरून निवृत्त. *बेलभाषा* (भाषाविषयक स्फुटलेखन), *मराठी शारदीयेच्या चंद्रकळा* (संपादन) व *लीळाचरित्रातील समाजदर्शन* ही पुस्तके प्रकाशित. महाराष्ट्र साहित्य परिषदेचा 'रा०श्री० जोग समीक्षा पुरस्कार'.
टपाल पत्ता : फ्लॅट 2, ए 3 'सितार', नादब्रह्म हाउसिंग सोसायटी, वारजे, पुणे 411 058, स्थिरभाष : (020) 2523 4142 : चलभाष : 090289 98199

● **भट-बेहेरे** (डॉ०)अनघा : पीएच०डी० (रशियन), व्यावसायिक भाषांतरकार. पुणे विद्यापीठाच्या परकीय भाषा विभागात रशियन भाषेचे अध्यापन, २००६मध्ये प्रकाशित झालेल्या रशियन-मराठी शब्दकोशाच्या निर्मितीत सहभाग. सध्या मराठी-रशियन-जर्मन अशा त्रैभाषिक कोशाचे काम चालू. 'केल्याने भाषांतर' ह्या त्रैमासिकाच्या सुरुवातीपासूनच्या संपादक.

टपाल पत्ता : 3, 'बसंत बहार', 119/2, प्रभात रस्ता, पुणे 411 004, ई-पत्ता : anaghb2@redifemail.com चलभाष : 098226 11969

● **भट, (डॉ०)** विवेक : रासायनिक अभियंता. वयाच्या पन्नाशीनंतर एम०ए०(संस्कृत) व त्यानंतर एम०ए० (भाषाविज्ञान). पीएच०डी० मुंबई विद्यापीठाच्या जर्मन विभागात भाषाविज्ञान व इंग्लिश संज्ञापन या विषयांचे अभ्यागत प्राध्यापक.

टपाल पत्ता : 26/बी, किशन कुंज, जीवनविकास मार्ग, विलेपार्ले (पूर्व), मुंबई 400 057. स्थिरभाष : (022) 2083 5689, चलभाष : 098701 93649

● **मालशे,** (डॉ०) मिलिंद : आय०आय०टी०(मुंबई) येथे इंग्रजीचे प्राध्यापक. मराठी व इंग्रजीमधून लेखन. पीएच०डी०चे मार्गदर्शक, परीक्षक. अनेक विद्यापीठांच्या निवड समित्या, अभ्यासमंडळे यांचे सदस्य. भाषाविज्ञान व सौंदर्यशास्त्र या विषयांचे अध्यापन. 'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धांत आणि उपयोजन'सह अनेक मराठी व इंग्रजी पुस्तके प्रकाशित. हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताचे अभ्यासक व गायक. स्थिरभाष : (022) 2570767, चलभाष : 098203 45492

### साभार पोच

**विवादे विषादे प्रमादे प्रवासे** (कथासंग्रह) : प्रशान्त बागड, शब्द पब्लिकेशन, मुंबई ४०००५१. पृष्ठे १२८. किंमत रु० १३५/-

**काळे पांढरे अस्फुट लेख :** अनिकेत जावरे, हर्मिस प्रकाशन, पुणे ४११०३७. पृष्ठे १३१. किंमत रु० १४०/-

**कोया बोली** (गोंडी शब्दसंग्रह) : लेखक व प्रकाशक तिरू० सीताराम मंडाले, पुणे ४११०४१. पृष्ठे १२०. किंमत रु० ७०/-

**त्रैमासिक 'सक्षम समीक्षा'** (नाटक विशेषांक) : संपा० डॉ० शैलेश त्रिभुवन. (एप्रिल-जून २०११) पृष्ठे ६०. किंमत रु० ४०/-

**मराठी हायकु पत्रिका (त्रिदळ) :** वर्ष १, अंक ५,६,७,८,९,१० (मार्च-सप्टेंबर, २०११) प्रकाशक, संपा० स्वामी-श्याम खरे, इंदूर ४५२००७. किंमत (प्रत्येकी २/- रु०)

